॥ श्री विठ्ठल प्रसन्न ॥

# संगीत श्रीपुंडलीक नाटक

तीन अंकी संगीत नाटक

: लेखक :

कै. बाबाजीराव राणे

[ राजापूरकर नाटक मंडळी ]

रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई ४.

: प्रकाशक :
कृ. ना. सापळे,
रामकृष्ण प्रकाशन मंडळ,
त्रिभुवन रोड, मुंबई ४

किंमत १॥ रुपया



आवृत्ति ७ वी : जानेवारी १९५२

: मुद्रक :
कृ. ना. सापळे
रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस,
त्रिभुवन रोड, मुंबई ४

# प्रकाशकाचे दोन शब्द

वारकरी सांप्रदायांत भक्त पुंडलिकाचें स्थान श्रीविठ्ठलाचे बरोबरीनें मानण्यांत येतें. श्रीविठ्ठल दर्शनाचे पूर्वी पुंडलीकदर्शन घ्यावें तरच विठ्ठलदर्शनाचें पुण्य लाभतें अशी भक्तांची निष्ठा असून आजहि पंढरपुरांत त्याची प्रचीति येते.

पुंडलिकचरित्राचें रहस्य नीट उमगल्यास भक्तिमार्गी वारकरी पंथ घरदार संसार सोडून भक्ताला कर्मपराङ्मुख करतो हा आक्षेप किती निराधार आहे हें उमगून येईल. आपल्या प्राप्तकर्तव्याचें निष्ठापूर्वक आचरण करणारा संसारी मनुष्यहि खरा परमेश्वरभक्त असूं शकतो, हें या चरित्रावरून दिसून येईल. आणि हीच शिकवण परमेश्वरभक्तीप्रमाणें जीवनाच्या मार्गांत आचराव्या लागणाऱ्या सर्व गोष्टींत खरी व प्रभावी आहे.

कै. बाबाजीराव राणे यांनीं या नाटकांत पुंडलिकचरित्र सरळ आणि रोखठोकपणें चित्रित केलें आहे. हेतू वरील निष्ठा अचल असली आणि त्यांत जिव्हाळा असला म्हणजे कलेचीं उपकरणें व तंत्र यांचा विचार करावा लागत नाहीं, उलट अशी निष्ठावन्त कृति ही स्वयंपूर्ण कलाकृति ठरते, याचा अनुभव पुंडलिक नाटकाचे वाचनानें आणि नाट्यदर्शनानें महाराष्ट्रजनतेनें आज अनेक वर्षे घेतला आहे आणि तो आनंद अद्यापहि लुटूं शकेल असा आम्हांस भरंवसा वाटतो. अर्थात् हें पुस्तक महाराष्ट्रजनतेस सादर करतांना आम्हांस किती समाधान वाटत आहे, हें निराळें सांगावयास हवें काय ?

—प्रकाशक

॥ श्रीदत्तप्रसन्न ॥

# संगीत श्रीपुंडलीक नाटक

## अंक पहिला

### नांदी

नमूं नंदानंदकंदा । जगद्वंद्या चिदानंदा । कुंदरदना भो मुकुंदा ॥ काव्यगुणयुत नाट्यछंदा । रचित लघुमति, मधु सुगंधा । तोषवुनियां लोकवृंदा । हरिल चिंता मदानंदा ॥

गातां विमला प्रभुला जन धाला । काला भ्याला कलि-घाला जरि आला, हरला भवि तरला॥ पंडुकुला रक्षाया-साठीं । द्रौपदिरक्षणिं वलतां पाठीं । पार्थरथीं घे करिं काठी । भ्रमतां हरि ये भीमानिकटीं । ठेवी कर कटिं जो जगजेठी । होवो सुखकर सदां तुम्हांला ॥

**सूत्रधार**—असो. आतां नाटकालाच आरंभ करावा.

**दुर्गति—**( पडद्यांत ) अरे दैवा, आतां माझी वाट तरी काय होणार ?

**सूत्र०**—अरे! या मंगलाचरणारंभींच हें अशुभ चिन्ह कसलं? मित्रा मारिषा, ही रडारड कसली ? (कलि हंसतो) अरे! हें कोण हंसलं? हं, समजलों. भगवंताच्या नामानं सर्वार्थ साधतात, असं मीं म्हटलं म्हणून ही दुर्गति इकडून शोक करीत येत आहे आणि इकडून कलि हंसत येत आहे. ठीक, एकीकडून कलि आणि दुसरीकडून दुर्गति. दोघांचेंहि दर्शन शुभच! तर आतां आपण तिसऱ्याच वाटेनं जावं. कारण—

नको कलिचा तो वास पळहि कोठें ॥ दुःखपर्वत पडतात शिरीं मोठे ॥ पुढें दुर्गति ये तीस कुणीं ध्यावें ॥ जन्ममरणाचे भार कां वहावें ॥ [ जातो.

**कलि**—(प्रवेश करून) हाः हाः हाः मौजच मौज! बंधनांतून मुक्त झाल्यामुळं, मला इतका आनंद झाला आहे कीं, हर्षवायूनं माझं पोट फुगेल कीं काय असं वाटतं. (हंसतो.) अरे! पण आमची स्वारी बंधमुक्त झालेली पाहून आमचं स्वागत आमच्या स्नेही मंडळीपैकीं कुणीच करीत नाहीं हें कसं?

**दुर्गति**—(प्रवेश करून) मेल्या दुर्दैवा, आतां या दुर्गतीचं कसं होणार? आतां जो मेला लठ्या गेला, त्याच्या उपदेशाप्रमाणं सारेच जर भगवद्भक्त बनले, तर माझा अंगिकार तरी कोण करणार? [रडते.

**कलि**—अरे! हें तर रडं ऐकूं येत आहे! स्वागत करण्याची ही अगदींच निराळी तऱ्हा! बरं, ही स्त्री तरी कोण? अस्मादिकांना शोभेल असंच हें रत्न आहे. वाहवा! जोडा पण जोडा! ही रडकी, मी हंसरा. गंगाजमीनच जोडा! आणि यापुढं हें जग तरी असंच चाललं पाहिजे. एकानं हसलं पाहिजे, तर दुसऱ्यानं रडलं पाहिजे. एकानं चढावं तर दुसऱ्यानं पडावं, तरच या जगाची शोभा! [हंसतो.

**दुर्गति**—झालं! तावडतोब अनुभव आला. मला अशी अनाथ पाहून हा पोळ सारखा हंसतो आहे. हांस-हांस-मेल्या, पोटभर हांस.

**कलि**—रड-रड-टवळे, पोटभर रड. अरे, पण ही तर आमची दुर्गति! दुर्गति, तूं ग कां अशी?

**दुर्गति**—कोण कलि? अगबाई! आतां कां म्हणून मी रडेन? ये, आतां आपण दोघेंहि हसूं. (हंसतात.) ऐन वेळीं भेटलास, छान झालं. तुझ्याशिवाय मला अगदीं ओकं वाटत होतं. आतां माझ्या तावडींत कोण सांपडत नाहीं तें मी पहातें.

**कलि**—तर मग आतां आपण आपला कार्यक्रम ठरवूं या. आजपासून बाप-लेक, सासू-सून, नवरा-बायको, बहीण-भाऊ यांच्यांत मी कलह लावीत फिरणार.

**दुर्गति**—आणि त्या मेल्यांना मी अधोगतीस देणार. एकदां तुझा संचार जगांत झाला, कीं या दुर्गतीचं पोट भरलंच समज. चल तर या जगत्‌रंगभूमीवर मनसोक्त क्रीडा करायला.

**कलि**—जरा थांब. आपल्याला वेष पालटून गेलं पाहिजे. कुणीहि ओळखतां कामा नये. तर तूं हो आतां चमकाजी नांवाची नायकीण, आणि मी होतों तुझा साथीदार—काळूराम उर्फ काळ्या.

**दुर्गति**—शाबास! काळ्या, पण आरंभ कुठून करायचा?

**कलि**—हें पहा, आपण लोहदंड क्षेत्राजवळच उभे आहोंत, तर तेथूनच आरंभ करूं या. तें बघ पुंडलिकाचं घर. चला, तिथंच पहिल्यानें घुसूं. पण यापुढं आपण जें नाटक करणार, त्यांतील मी सूत्रधार आणि तूं नटी. समजलीस?

**दुर्गति**—वाहवा रे सूत्रधार! तर मग होऊं दे सुरवात. [ दूर जाते.

**कलि**—प्रिये, पात्रांची सिद्धता झाली असल्यास जरा इकडे ये पाहूं.

**दुर्गति**—काय आज्ञा आहे—प्राणनाथ? [ मुरडत येते.

**कलि**—सांगितल्याप्रमाणें सर्व पात्रं सिद्ध आहेत ना?

**दुर्गति**—हें काय विचारावं प्राणनाथ? सर्व सिद्धता आहे.

**कलि**—शाबास! यंव रे नटी!

**दुर्गति**—वारे सूत्रधार! [ हंसत नाचत जातात.

---

## प्रवेश पहिला

[ जन्हुशर्मा पोथी वाचीत बसला आहे. इतक्यांत पुंडलिकाची बायको व आई भांडत येतात.

**सत्यवती**—अग, पण सासूच्या अंगावर हात टाकतांना कांहीं लाज धर.

**जखाई**—केरसुणीखालीं झोडपली नाहीं, हें भाग्य समज. थेरडे, ( वेडावून ) ‘मी माहेरीं दिलं, घर धुतलं,’ असं म्हणायला मीं काय ग दिलं! रिकाम्या हातानं माहेरच्या गड्याला पाठवूं नये, म्हणून कुठं गोणीभर तांदूळ, पोतंभर डाळ, हराभर भाजीपाला, टोपलीभर फळफळावळ आणि बाबांना अंगरखा, शेला, पागोटं दिलं. आणखी मेलं ‘दिलं दिलं’ तें काय! तुझं मढं दिलं!

**सत्य०**—हं. इतकं दिलंस, तरी कांहींच नाहीं ! मग हें घर तरा कशाला ठेवलंस ? तेंहि पाठवून द्यायचं होतंस.

**जखाई**—थेरडी कसं कुजकं बोलते पहा. पण मी म्हणतें, मी सगळं घर लुटून देईन, त्याचा तुला एवढा डांगोरा पिटायला कुणीं सांगितला ?

**जन्हुशर्मा**—बरं बाई. तिची चूक झाली. क्षमा कर. तूं काय हवं तें आपल्या माहेरीं दे, आणि माहेरच्या माणसांना सुखी ठेव.

**जखाई**—मेली सगळी दुस्मानगिरी काय ती माझ्या माहेरच्या माणसांशीं. जरा कुठें दिलं घेतलं कीं डोळे फुटतात. पण असे डोळे फुटायला नकोत बरं ! पुरलेलं डबोलं, मेल्यावर कुणी मढ्यावर देणार नाहींत. आतां या उतार वयांत पैशाअडक्याचा लोभ हवा कशाला ?

**जन्हु०**—मुली, आम्हीं लोभ धरला आहे कुठं ? सर्व संसार तुमच्या अंगावर सोंपवला आहे. पैसाअडका तर पुंडलिकाच्याच स्वाधीन केला आहे. मग उगीच असं बोलून आमच्या हृदयाला घरे कां बरं पाडतेस.

**जखाई**—अहाहा, केवढं पण कोवळं हृदय ! म्हणे 'हृदयाला घरें पडतात.' फुटेल बिटेल हो तें हृदय. जपून ठेवा. म्हणजे मेल्यावरहि माझं वैर उगवतां येईल. देवा, काय रे हे वनवास ! [ हातपाय आपटते.

**घडिभरीं सुख न घरिं जाच भारी ॥**
**अविचारी हे वैरी अघोरी ॥ बिचारी उगिच छळितीं यापरी ॥**
**सासुसासरे यांसम दुसरी ॥ नसती कोणीं अवनीवरि ॥**
**गोड बोलतें सेवा करितें ॥ नाहीं कांहीं यातें परि ॥**
**व्याधपंजरीं हरिणि गोजिरी ॥ पडली सोडवि इजला हरि ॥**

**सत्य०**—मुली, तुझी आम्हीं इतकी काळजी बाळगतों, तरी तूं आम्हांला दावेदार, वैरी समजतेस ना ? बरं बाई ! तुमच्या सुखाकरतां, आम्ही जे इतके काबाडकष्ट करतों, ते तुमच्या हिशेबांत नसायचेच; नशीब !

**जखाई**—अहाहा ! उजेड ! कष्ट करणारांचीं तोंडं पहा. मेलं घरांतलं काम तें काय ? तर चार माणसांचा स्वयंपाक करायचा, पाणी भरायचं, झाडसारवण करायचं, धुणीं धुवायचीं; आणि फारच झालं, तर भांडीं घासायचीं ! पण तें सुद्धां मेलं होत नाहीं धड. अन् सदा मेली रडारड. [ अंगावर खेकसते.

**सत्य०**—अगदीं खरं ! सगळा कामाचा उजेड तुझाच बरं. मऊसं नेसावं, चांगलंसं लेणं ल्यावं, गोडसं खावं, पलंगावर झोंपावं आणि खाल्लेलं पचवायला आम्हां म्हातोऱ्यांवर तोंडसुख घ्यावं. खरंच हो, या कामाच्या रगाड्यानं माझी वया कशी अगदीं वाळून गेली हो !

**जखाई**—अग थेरडे ! अशा नासक्या कुजक्या बोलण्यानं तर ही दशा. हातानं काम व्हायची रड, पण टोंचून बोलणं पहा कसं चुरुचुरुं आठवतं.

**जन्हु०**—बाई ग, आम्हीं पिकलेलीं पानं, केव्हां गळून पडूं याचा नेम का आहे ? आतां म्हातारपणीं तुम्हां तरुणाप्रमाणं आमच्या हातून कसं बरं काम होणार ? हें संसाराचं जोखड आतां तुम्हींच मानेवर घ्यावं.

**जखाई**—आणि तुम्हांला देव्हाऱ्यांत बसवून पूजावं. होय ना ?

**सत्य०**—देव्हाऱ्यांत न बसवतां पुंडलीक नी तूं दररोज आमची पूजा करतां ही का थोडी आहे ? असो. शेवटचे उरलेले दोन दिवस कसे तरी काढले पाहिजेत.

**जखाई**—म्हणजे ? ते दोन दिवस असे भांडून काढणार वाटतं ? घ्या ! घ्या ! जितकं लावून, टोंचून, बोलून, छळून घ्यायचं असेल तितकं घ्या. कुठची मेली साडेसाती नशिबीं आली आहे कोण जाणे ! [ खेकसते

**जन्हु०**—मुली, तुला जर आम्हीं साडेसातीप्रमाणं वाटतो, तर पुंडलिकाकडून आमची एकदां वाट लाव कशी. तो तर तुझ्या अर्ध्या वचनांत वागतो.

**जखाई**—थांबा हं. तर मग तसंच करतें. जों जों मी आधिक बोलत नाहीं, तों तों अधिक शेफारलांत.

**प्रियकरा कथिन हें अतां जरी ॥**
**न होय तुमची गती बरी ॥**

**जन्हु०—तुज रुचेल बाई तसें करीं ॥**

**जखाई—डाग देतां कां वरी ॥ प्रिय० ॥**
**मनास तिळभर नसेच चिंता ॥**
**घरांत बसोनि खुशाल गिळतां ॥**
**झोंप घेतां दिनभरी ॥**

**जन्हु०—वृद्धपणा तुज येतां पुढती ॥**
**येईल बघ याची प्रचिती ॥**

**जखाई—भाकित तुमचें पुरें पुरें तें ॥**
**जाणतें मी सगळें अंतरीं ॥**

**जन्हु०—आजवरि बहुपरि, सुख दिधलें तरी ॥**

**जखाई—चीज केलें यापरी ॥** [ रागानें पाय आपटीत जाते.

**सत्य०**—झालं ! आतां कांहीं बाकी राहिली आहे का ? म्हणून म्हणतें चला, कुठं तरी काशीला, नाहीं तर रामेश्वराला. विट्ट आला मला या घराचा.

**जन्हु०**—तें सगळं खरं; पण आतां म्हातारपणीं जायचं कुठं मरणांत ? एखाद्या रानावनांत मरून, कोल्हाकुत्र्यांच्या तोंडीं का प्रेतं द्यायचीं आहेत ? मुलाच्या हातून शेवटची गति मिळेपर्यंत इथंच राहून, देवाची करुणा भाकूं झालं. रामा, नको बाबा आतां अंत पाहूं.

**दैवीं न या काय सुखलेश रामा ॥ कामास विटलों चिरसौख्यधामा ॥ वृद्धपणीं काबाडकष्ट हे होती न पाहीं आम्हां ॥ सून बोलते कठोर वाणी, पुत्र न दे आरामा ॥ बहु सायासें पुत्र जाहला परि न येतसे कामा ॥ दोष गणुनि हा निजकर्मांचा गाऊं विभो तव नामा ॥** [ पुनः पोथी वाचूं लागतो.

**पुंडलीक**—( प्रवेश करून ) अरे धोंड्या, कोंड्या, गुंड्या, बंड्या, चला आटपा, दिवाणखाना चक्क झाडून टाका. थेरडोपंत, काय चाललं आहे ?

**जन्हु०**—पोथी वाचतों आहें.

**पुंड०**—तर मग पडवींत जाऊन तें चऱ्हाट वळा.

**जन्हु०—कां बरं ?** इथं काय आहे ?

**पुंड०—तुमचं पिंडदान करायचं आहे. उलथा इथून.**

**जन्हु०**—अरे पण मला आधीं पुरता मरूं दे तरी, मग पिंडदान कर नाहीं तर श्राद्धतर्पण कर. अग, ऊठ ऊठ लवकर, नाहीं तर चिरंजीव खाऊ देतील पोटभर.

**सत्य०**—कां बरें ? आहे काय ? गडबड कसली ?

**पुंड०**—गडबड तुझ्या तेराव्याची. हं, चला. तिकडे पडवींत जाऊन धडपडा.

**जन्हु०**—जातों बाबा. पण म्हटलं, इथं भजनबिजन जर कांहीं असलं तर तवढंच रामाचं गोड नांव आम्हां म्हाताऱ्यांच्या कानीं पडेल.

**पुंड०**—तो रामा गेला मसणांत आणि तुम्ही जा सरणांत.

**जन्हु०**—बाबा रे, आम्हांला सरणांत घाल वाटेल तर, पण देवाला शिव्या देऊं नकोस. चल ग पडवींत.

[ जाऊं लागतात तोंच गोसावी येतात.

**गोसावी**—( प्रवेश करून )

**शंकर शंकर हरदिन गावो वोही शंकर हितकर है ॥**
**दान धरममें रत रहना बे धरमहि आखर जसकर है ॥**
**मेहेल रहेगा धनहि रहेगा जोरु न अंतिम साथी है ॥**
**बेटाबेटी काम न आवे माया नरको भोती है ॥**
**झूटी काया झूट पसारा जो कोई तूं मानत है ॥**
**वोही सत् है लेकिन तूं नाहिं अपने कोही जानत है ॥**
**साथ करम ले तूंहि जायगा आखर धरमहि आता है ॥**
**संतनकू जो तुने खिलाया कभी न मोफत जाता है ॥**

**जन्हु०**—अहाहा ! हे साधु खरे भाग्यवान्, नाहीं तर आम्ही. बिचारे अष्टौप्रहर देवाचं नांव घेऊन, स्वतःबरोबर आम्हां पाप्यांना सुद्धां पावन करून उद्धरून नेतात. साधुमहाराज, जरा थांबा हं. बाळा पुंडलिका, हे साधुलोक आशेनं आपल्या घरीं आले आहेत.

**पुंड०**—कशाला ? झक मारायला आले आहेत ?

**जन्हु०**—भीक मागायला आले आहेत !

**पुंड०**—कां ? लोकांचीं घरं जळालीं ?

**जन्हु०**—त्यांना कांहीं धर्म कर.

**पुंड०**—ते साधु एक शहाणे आणि तुम्ही सात शहाणे. तुमच्या सांगण्यावरून, आम्ही वाटेल त्याला असं देऊं लागलों, तर लवकरच घरादाराचं वाटोळं होऊन, आम्हांलाही त्यांच्याप्रमाणंच उलटी अंबारी घेऊन दारोदार भीक मागावी लागेल. तुम्हांला काय ? तुम्ही उद्यां जाल उरावर हात घेऊन, पण मला नि माझ्या बायकोला अजून जन्म काढायचा आहे. चालते व्हा रे गुलामांनो, का मारूं गचांडी ?

**गोसावी**—गचांडी कायकू होना बेटा ?

**पुंड०**—मग काय होना लेका ?

**गोसावी**—भय्या, ये कौन तेरा लडका है ?

**पुंड०**—हां हां. भिकारी तर भिकारी आणि घरादाराची चौकशी करी. होय, मी त्यांचा लडका नि हे आमचे थेरडे. तुम्हांला पाहिजे तर ही दोघंहि घेऊन जा. आमचा त्रास जाईल आणि तुमचं काम होईल.

**गोसावी**—अरे बेटा, क्यौं इतनी लंबी लंबी बातें करते हो ? तेरी खुशी नहीं, तो हम चले जाते है. [ जाऊं लागतात.

**जन्हु०**—साधुमहाराज, आपण जाऊं नका. मुलगा जरा अल्लड आहे.

**पुंड०**—( वेडावून ) आणि हा थेरडा खल्लड आहे.

**जन्हु०**—तुम्ही आमच्याकडे पहा. आपल्याला द्यायला आमच्याजवळ कांहीं जरी नसलं, तरी हे दोन हस्तक आणि तिसरं मस्तक आहे, तेंच तुमच्या पायांवर ठेवतों.

**गोसावी**—उठो, खडा हो भय्या—

**पुंड०**—हां. उभा हो भैय्या.

**गोसावी**—तुम बडे दिलदार हो. हमकू कुछ नहीं होना. भगवत्‌की कृपासे हमकू सब कुछ मिलेगा. तेरे सरीखे दाता आदमीका भगवान् भला भला करे.

**सत्य०**—बाबांनो, आतां आमचं बरं व्हायचं काय राहिलं आहे ? आपण हाच आशीर्वाद माझ्या बाळाला द्या.

**पुंड०**—( वेडावून ) नको बरं, नको. आतां या भिकारड्यांच्या आशीर्वादानं मला स्वर्गांतून विमान येणार आहे जसं !

**गोसावी**—अरे बेटा, इतनी मगरूरी क्यौं करता है ? जरा सुन ले—

**पद** [ तो हा गिरिधारी ]

**जबानी बोलो मीठी ॥ जैसी हंडी फूटी वैसी जिनगानी**
**है झूटी ॥ न दे हमे आटा भरकर मूठी ॥ फिरे हम कोटी**
**घरघर चाहिये न रोटी ॥ जनम दिया तुज उनपर फाटी ॥**
**आंखें कैसी छोटी बाबा माया तेरी टूटी ॥ माबापनको**
**दिखावे न लाठी ॥ अक्कल तेरी खूटी क्यौंबे जबानीसे छूटी ॥**

[ पुंडलीक गोसाव्यांना लाथ मारून घालवितो.

**जन्हु०**—( वाईट वाटून ) अरे, अरे, अरे ! हें पाहण्यापेक्षां आम्ही निपुत्रिक असतों तर फार बरं झालं असतं.

**पुंड०**—अरे थेरड्या, मग पुत्र व्हायला झक मारायला नवस केलेस कशाला ?

**जन्हु०**—नवस केले, तुझ्याकडून असं बोलून घ्यायला.

**पुंड०**—का कुळाचा उद्धार व्हायला ?

**सत्य०**—हं. कुळाचा उद्धार ! कधीं होईल तेव्हां होईल, पण आमचा मात्र उद्धार तूं रोज असा करतो आहेस. देवाजवळ मागितला चांगला पुत्र, पण त्यानं दिलं हें चावरं कुत्रं. नशीब आमचं.

**पुंड०**—थेरडे, तोंड संभाळ. आई असलीस, म्हणून वाटेल तें ऐकून घेणारा हा मुलगा नव्हे—समजलीस ? त्या बोळकं झालेल्या तोंडाची एकदम परीटघडी करीन.

**जन्हु०**—बरं बाबा. काय करशील तें खरं. चल ग पडवींत. देवा, कुठं रे तूं लपला आहेस ?

**पुंड०**—तो देवळांत लपला आहे. तुम्हीं जाऊन पडवींत धडपडा.

**जन्हु०—**

तूं मुक्तिसुखाचें धाम प्रभो श्रीराम भक्तजनकाम पूर्ण करिसी ॥ बहु असली करुणावंत बसुनि परि संथ अजुनि कां अंत असा बघसी ॥ मी महापातकी काय म्हणुनि रघुराय करविसी हायहाय मजसी ॥ बहुकलें वत्स घाबरें वनीं हंबरे धेनुका त्वरें जाय सरसीं ॥ त्वां तारियलें बक गजेंद्र नक्रादिकां ॥ वाल्मीकि उद्धरुनि दाखविलें कौतुका ॥ जड मीच कसा मग झालों रघुनायका ॥ हंसतील अज्ञानें सन्त म्हणुनि मत्स्वांत तुटे परि खंत तुला न कशी ॥ ने तुझ्या पदीं दे ठाव राघवा धांव असा कां भाव दुजा धरिसी ॥ [ जातात.

**पुंड०**—ही साडेसाती आणि हा शनि माझ्या मागचे कधीं जातील ते जावोत. त्यांच्याकडे पाहिलं म्हणजे—

मन माझें क्रोधें भडके पाहुनि यांस सामोरीं ॥
बाप नव्हे हा सापचि वाटे ॥ आड येइ सौख्याच्या वाटें ॥
ठेंचुन चेंचुन वटवट कटकट बंद करूं सारी ॥
आइ न ही दुःखाची खाई ॥ होइल सुख जरि उलथुनि जाई ॥
येइल तो दिन कधिं तरि सुखकर आस ही भारी ॥

[ मोहनशेट, काळ्या व शास्त्री येतात.

—या या मोहनशेट. या काळूरामजी. किती उशीर हा ? घरच्या माणसांनींच असं केल्यावर मग काय बोलायचं ?

**काळ्या**—वाईच झाला खरा वखत.

**पुंड०**—बरं या. बसा, पान घ्या.

[ पानसुपारी खात बसतात तोंच जखाई येते. तिला पाहून लपून बसतात.

**जखाई**—( प्रवेश करून ) आज या मेल्या बाजारबुणग्यांना जमवून इथं गोंधळ का घालायचा आहे ?

**पुंड०**—गोंधळ नाहीं ग. मनाला करमणूक हवी, म्हणून नायकिणीचं नाचगाणं करण्याचा विचार आहे.

**जखाई**—काय म्हटलंत ? नायकिणीचं नाचगाणं ? आणि तें आपल्या ब्राह्मणाच्या घरांत ? इश्श.

**पुंड०**—त्याला काय हरकत आहे ? देवाच्या पवित्र देवळांत, लग्नांत, मुंजींत सुद्धां नायकिणीचं नाचगाणं चालतं. मग आपला काय पाड ?

**जखाई**—पुरेत हे लाड. त्या तसल्या बाजारबसव्यांना आणून भलतीं सलतीं थरं माझ्या घरांत करतां कामा नये. काय म्हणे, देवळांत नायकीण नाचते. 'देवाचं नांव नि पुजाऱ्याचं गांव.'

**पुंड०**—खुळी रे खुळी ! अग ए, नीट ऐक तरी. येणारी नायकीण बायको नव्हे.

**जखाई**—नायकीण असून बायको नव्हे ? हें आजच ऐकतें मीं. छेः ! मला नाहीं हें खरं वाटत. 'म्हैस गेलें हांकायला नि गाढव लागलं घुसायला' तसं व्हायचं.

**पुंड०**—छे ग. तुझ्या गळ्याशपथ. एका पुरुषालाच बायकोचं सोंग देऊन त्यालाच नायकीण म्हणायचं ठरलं आहे. ( स्वगत ) कशी थाप दिली ?

**जखाई**—होय का ? मग–मग नाहीं कांहीं हरकत. [ जाऊं लागते.

**पुंड०**—हं. आतां कसं गोड बोललीस ? आतां दे बरं एक साखरेचा.

**जखाई**—इश्श. कांहीं तरी मेली लाज ? भलत्या वेळीं भलतंच.

**पुंड०**—तसं नव्हे. आतां एक–गोडसा–घेतला असता, म्हणजे सकाळपर्यंत तोंडाला रुचि राहिली असती.

**जखाई**—पुरे झाला हा चहाटळपणा. पण हा धुडगूस लवकर आटपावा, नाहीं तर सांगेन काय तें. [ जाऊं लागते.

**पुंड०**—जी हुकूम राणीसाहेब.

**जखाई**—( परत येऊन ) पण ऐकलं का ? उद्यां त्या सोनाराकडून ठुशी आणावी.

**पुंड०**—ठीक. ओठांच्या गोडीकरितां, जोडीहि आणण्यांत येईल.

**जखाई**—तसंच त्या कासाराला म्हणावं, उद्यां चांगल्या बांगड्या घेऊन ये.

**पुंड०**—घेऊनच यायला सांगूं ना? ( स्वगत ) का म्हटलं, मलाच भरून यायला सांगतेस.

**जखाई**—आणखी ऐकलं का—

**पुंड०**—अग पण तुला काय सांगायचं तें एकदम सांग. उगीच मोटेच्या लाप्रमाणें ' ये जा ' नको.

**जखाई**—म्हणतें, फार वेळ हा गोंधळ चालतां कामा नये? कुणी मोठ्यानं ओरडतां कामा नये. आजचा दिवस गय करतें; पण यापुढें ध्यानांत ठेवा—

**या ढंगीं सुख वाटे ॥ परि जा न त्या वाटें ॥ बहु बोंचती**
**पदिं टोंचती, असती खडे कांटे ॥ प्रिय मित्र बहु मोठे ॥**
**दिसती परी खोटे ॥ भरतील मन हरतील धन घेतील**
**पागोटें ॥ दिन येति उफराटे ॥ मग कोणि ना भेटे ॥**
**निज अंगणीं, न उरे कुणी, तुम्हि आणि अरिष्टें ॥**
**होतां असे तोटे ॥ मग जाल तुम्ही कोठें ॥ नच हें जरी**
**गणिलें तरी बसती शिरीं सोटे ॥** [ जाते.

**काळ्या**—हें काय हो पुंडलीकराव, बायकोच्या पाया पडण्याचा इधि आटपला कीं नाय? आम्हीं किती येळ रखडत बसावं?

**पुंड०**—चूप. मोठ्यानं बोलूं नकोस. नाहीं तर पुनः कडकडाट होईल. बरं पण अजून चमकाजी कां येत नाहीं?

**लिंबाजी**—( घाईनें येतो. ) पुंडलीकराव, तुम्हीं असे थंडे थंडे बसलां काय? आमच्या चमकाजी आल्या.

**पुंड०**—खरं कीं काय? तर मग उठा सगळे. चमकाजीचं स्वागत करा.

[ सर्व परिवारासह चमकाजी व पुंडलिकाचे मित्र येतात; पुंडलीक सर्वांना आदरानें बसवितो. तोंच लिंबाजी पाटील चमकाजीचे शेजारीं बसतो. पुंडलीक त्याची निर्भत्सना करून त्याला दूर बसवितो.

**पुंड०**—बरं, चमकाजी, घ्या पान घ्या. का करून देऊं ?

[ पानसुपारी खात बसतात.

**लिंबाजी**--वाहवा रे न्याय ! वाहवा रे प्रामाणिकपणा ! ! वाहवा रे जग ! ! ! जिचा इतका आदरसत्कार चालला आहे, त्या चमकाजीचा, मी सख्खा जुना यजमान असून, माझी कोणीच उठाबस करीत नाहीं. अहो, मला नुसतं कोणी पान घ्या देखील म्हणत नाहींत. आणि चमकाजीला म्हणतात कीं, यावं चमकाजी, बसावं चमकाजी, पान घ्यावं चमकाजी, कां करून देऊं चमकाजी ! अरे वारे तुझी चमकाजी. बरं आहे म्हणावं. काढीन याचा वचपा, आतां कांहीं तरी युक्ति काढून या सगळ्यांचा इथल्या इथं फजितवाडा न उडवीन तर नांवाचा लिंबाजी पाटीलच नव्हे. [ जातो.

**पुंड०**—बरं चमकाजी, आतां सुरू करायचं म्हटलं.

**चम०**—पहिल्यानं मुलींचाच नाच होऊं द्या.

[ नाच सुरू होतो; इतक्यांत जखाईला घेऊन लिंबाजी येतो.

**लिंबाजी**—पाहिलंत वहिनी, कसा रंग उडून राहिला आहे तो ? राम राम राम ! हॅट. तुम्हां ब्राह्मणांच्या घरीं आणि असला गोंधळ ? हॅट. आणखी तो, तुम्हासारख्या सद्‌गुणी, मानी स्त्रीला खपतो अं ? राम राम राम ! हॅट.

**जखाई**—पण काय हो, ती–ती मध्यें बसलेली तर रांड दिसते.

**लिंबाजी**—मग तिला गरत कोण म्हणतो ? तिला रांड म्हणायला तिची सगळी वंशावळ नको शोधायला.

**जखाई**—बरं. पण काय हो, या पुरुष–रांडा आहेत कीं, बायका–रांडा आहेत ?

**लिंबाजी**—भले ! पुरुष कुठं रांडा असतात का ? अहो, खरोखरच ती रांड.

**जखाई**—असं काय ? थांबा तर. या रांडामेल्यांची थोबाडंच रंगवून सोडते. माझ्याशीं कपट अं ! [ रागानें जाते.

**लिंबाजी**—ठीक, ठिणगी तर पेटवली. आतां कांहीं वेळानं चांगली भडकली कीं आपला अपमान भरून निघाला. [ लपून बसतो.

**पुंड०**—बरं चमकाजी, आतां तुमचं कांहीं होऊं द्या. बोला, कोणता राग म्हणतां ?

**काळ्या**—लावनी राग म्हना कीं !

**मोहन**—अहारे कुणबटा ! चमकाजी, लावणी राग नको, पेरणी राग नको आणि कापणी राग पण नको, तो काळ्याचा मळणी, नाहीं तर झोडपणी राग काढा.

**लिंबाजी**—( स्वगत ) आतां झोडपणी रागच वाहिनी काढणार आहेत.

**पुंड०**—काय बेटे एकेक राग काढताहेत ? जसे गंधर्वांचेच बेटे ! चमकाजी, कानड्यांत म्हणा, कानड्यांत.

**काळ्या**—त्यांचे कानड्यांत कशाला, माझ्या नाकाड्यांत म्हणा कीं.

**चम०**—बरं बरं. समजली अक्कल ! बसा; मीच सुरेख राग काढते.

[ चमकाजी 'तुम्ही माझे प्रियकरा'—हें पद म्हणूं लागते तोंच जखाई सर्वांस मारून दाणादाण उडवते.

---

## प्रवेश दुसरा

### [ आंगण. ]

**लिंबाजी**—( प्रवेश करून ) कां ? कशी केली ? कशी पण उडाली मंडळीची फजिती ? माझा अपमान अं ! या लिंबाजी पाटलाची बेदाद केली, नाहीं का ? पण कशी गुलामांची झाडून चंपी करवली. आतां त्यांत दोन तडाके मलाहि बसले म्हणा, पण ऊंः त्याचं काय मोठंसं ? पोवळ्याबरोबर एखादा फटका ढवळ्याला बसायाचाच.

[ मार खाऊन पाठ चोळीत मोहन, काळ्या व चमकाजी पळत येतात व गडबडींत कपड्यांची अदलाबदल झालेली पाहून वरमतात.

**चम०**—चला निघा मेल्यांनो इथून—

**काळ्या**—अहो पन—अहो पन आम्हीं काय केलं, आमच्यावर कां ही संक्रांत ?

**चम०**—तुमच्यावर कां संक्रांत ? अरे मेल्यांनो, यंदांची संक्रांत तर मुळीं गाढवावरच बसली आहे.

**काळ्या**—मंग, बसली असेल. अमासनी काय त्येचं ?

**चम०**—तुमासनी काय त्येचं ? त्या गाढवाचे भाऊबंदच तुम्ही. मेल्यांनो, त्या पुंडलिकाच्या घरीं त्याची ती रांड आली नाहीं ना ? ( दचकते ) ती भांड-कुदळ, अवदसा, वेस्वा असतांना तिथं मला नेलंत कां ? मला आपली आज दुसरीकडची सुपारी आली होती. खरंच सांगतें, आजपर्यंत या चमकाजीनं, कुणा रांडेचं कीं कुणा मेल्याचं फट्ट म्हणून ऐकून घेतलं नव्हतं, पण आज त्या अवदसेनं मला झाडूनं मारलं कीं हो.

**काळ्या**—चुकलंच त्यें, असा कांहीं घोंटाळा होईल, याचं आम्हांला तरी सपान कां पडलं होतं ? बाकी ती म्हांकाली जर मंदीं तडफडली नसती तर गान्याची काय बहार झाली असती, बहार !

**चम०**—जळली मेल्यांनो तुमची बहार ! काय मेले हलकट आहेत बघा. रांडेच्यांनो मार खातां खातां माझी पाठ सुजून कसं घिरडं झालं आहे, आणि हे मले आपल्या बहारीकरतांच रडताहेत ! काय करूं ग ? मलाहि त्या वेळीं त्या रांडेचा असा राग आला होता कीं, आपणहि दोनचार तडाखे उडवावेत. पण मला अवकाशच मिळेना.

**काळ्या**—( स्वगत ) मार खातां खातां ! ( उघड ) व्हयकी चिभन. आन तुमचं हत्यारबी तिच्या हातीं ग्येलं.

**लिंबाजी**—खरंच तें. खऱ्या झाडूबहाद्दर आणि खेटरंबहाद्दर म्हणजे आमच्या चमकाजीच. पण आज उलटंच झालं. त्यांचं हत्यार तिच्या हातीं जाऊन, यांच्याच पाठीवर त्याचा प्रयोग झाला.

**चम०**—होय हो. पहा बरं मोहनशेट, माझी पाठ कशी गाजरासारखी लाल झाली आहे ती.

**मोहन०**—आणि चमकाजी, माझी पाठ पहा बरं कशी हिरवीनिळी झाली आहे ती !

**काळ्या**—आन माझी पाठ पहा पहा बरं, कशी वळ्यासारखी फुगून वर आलीया ती.

**लिंबाजी**—आणि माझ्यासारख्या गरिबाच्या पाठीचीं पहा बरं कशीं सालं निघालीं तीं !

**चम०**—जळो ती तुमची पाठ.

**लिंबाजी**—कां बरं.

**चम०**—कां बरं ? अहो, तुम्हाला नायकिणींच्या हातचे झाडू, जोडे, खायची संवय तरी आहे. पण या गोष्टीनं माझ्या अंगाची नुसती आग झाली आहे, आग—!

**मोहन०**—मला पण भारी राग आला आहे, राग.

**काळ्या**—वाटतंया कीं, तिच्या हातासनीं डाग द्यावा, डाग.

**लिंबाजी**—पण सध्यां गुपचुप बसणं आहे भाग.

**चम०**—भागुबाईच तुम्ही. गुपचुप बसाल तर काय झालं ? रांडेराघोरा कुठचे ! पण मी नाहीं गुपचुप बसायची; मी का अशी तशी बायको आहे !

**काळ्या**—( स्वगत ) नाहीं. झाडूचा मार खानारी है.

**चम०**—हो. कशी झालें, तरी मी सुतावरून स्वर्गाला जाणारी बायको आहे–

**काळ्या**—( स्वगत ) फांसाच्या दोरीवरून तर झट सर्गाला जाणारी है.

**चम०**—त्या रांडेची खोड मोडीन तेव्हांच मी स्वस्थ बसेन. चला माझ्या घरीं, आणि दरवाजे लावून तिची खोड कशी मोडायची याचं उजाडेपर्यंत खलबत करीत बसूं.

**काळ्या**—अलबत. लकडी बिगर मकडी वठणीला न्हाई येत.

[ जखाई येऊन सर्वांस मारते. सर्व पळतात. जन्हुशर्मा व सत्यवती घाईघाईनें येतात.

**जन्हु०**—काय ग, इथं तर कुणीच दिसत नाहीं. मग आरडाओरड नि धांवपळ ऐकूं आली ती कुठून ?

**सत्य०**—चिरंजिवाकडे कुणी सभ्य मंडळी यायची होती ना ? मला वाटतं त्या सभ्य मंडळीचाच हा कांहीं तरी सभ्यपणा असेल.

**जन्हु**—असेलहि. अलीकडे सभ्य शब्दाची व्याख्याच बदलली आहे. माणसांप्रमाणं बेटे शब्दसुद्धां उलटे फिरले आहेत. बरं, मुलगा मुलगी कुठं दिसतात का पहा.

[ इकडे तिकडे पहातात, तोंच लिंबाजी पाटील घाईनें येतो.

**लिंबाजी**—( स्वगत ) माझा अपमान ! मला भागुबाई म्हणते—

[ जन्हुशर्म्याला धक्का लागतो.

**जन्हु०**—काय हो, तुम्हांला दिसत नाहीं कीं काय ?

**लिंबाजी**—दिसतं हो. पण मी आपल्याच धांदलींत होतों.

**जन्हु०**—पण मी मरत होतों !

**लिंबाजी**—हरकत नाहीं. पण मी तुम्हांला एक गुप्त बातमी सांगतों. रात्रीं तुमच्या घरीं जी पांचट मंडळी जमली होती, त्यांचा तुमच्या सुनेनं केरसुणीनं चांगला खरपूस समाचार घेतला.

**सत्य०**—होय का ? छान झालं. ती जरी दांडगी असली, तरी माझ्या वयेला असले ढंग नाहींच आवडायचे.

**लिंबाजी**—अहो, पण पुढं ऐका. त्या चांडाळचौकडीनं तुमच्या सुनेचा सूड उगवण्याचा विचार केला आहे. आज भल्या पहांटेस भुताटकीच्या पारावर ती मंडळी तुमच्या सुनेवर कठीण प्रसंग आणणार आहे, तर सावध असा. मला आतां घाईचं काम आहे. जातों मी. ( स्वगत ) माझा अपमान अं ! थांबा गुलामांनो, इकडेहि लावालावी करून तुमच्या तंगड्या तुमच्याच गळ्यांत अडकवून पुन्हां हे लिंबाजी पाटील कोरे ते कोरेच ! [ जातो.

**जन्हु०**—काय ग, हा म्हणाला तें खरें असेल का ?

**सत्य०**—तो भला माणूस खोटं कशाला सांगेल? सूनबाईनं आपल्या तापट स्वभावाप्रमाणं त्या मंडळीला झोडपलं असेल.

**जन्हु०**—हो. आणि पुंडलिकाच्या संभावित मित्रांनीं आपला सभ्यपणाहि उधळला असेल. चल तर, चल लौकर. त्या शेजारच्या गुंडोपंताला हें वर्तमान कळवून, मुलीच्या संरक्षणाला तरी जाऊं.

---

## प्रवेश तिसरा

[ **पिंपळाचा पार.** जखाई प्रदक्षिणा करीत आहे. ]

**मोहन०**—हे स्त्रिये, आजपर्यंत तूं केलेल्या सेवेमुळें या पिंपळाजवळ राहणारी आम्ही भुतं संतुष्ट झालों आहोंत. तुला काय पाहिजे तें मागून घे. मी तळसमंध तुला प्रसन्न आहें.

**काळ्या**—मीबी खवीस तुझ्यावर लई खुस हाये.

**चम०**—आणि या हडळीची तुझ्यावर कृपादृष्टि आहे.

**लिंबाजी**—( स्वगत ) पण या लिंबाजी पाटलाची तुम्हां सर्वांवर वक्रदृष्टि आहे.

**जखाई**—अगबाई! आज या मेल्या भुताखेतांचं कुठून पेंव फुटलं? हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. आपण इथून जावं झालं.

**मोह०**—खबरदार, उभी रहा. अंगावरचे सर्व दागिने काढून दे.

**लिंबाजी**—( स्वगत ) गुलामाच्या अंगभर डागण्या दे.

**काळया**—मी म्हणेन ती माझी इच्छा पूर्ण कर.

**लिंबाजी०**—( स्वगत ) लुच्चाचं थोबाड रंगवून लाल कर.

**चम०**—शंभर वेळां नाक घांसून या हडळीच्या पाया पड.

**लिंबाजी**—( स्वगत ) पायपोसांनीं रांडेची पुनः पाट रगड.

**जखाई**—धांवा हो धांवा कुणी. मामंजी, सासूबाई, सोडवा हो सोडवा.

[ जन्हुशर्मा, सत्यवती, गुण्डोपंत येऊन तिला सोडवितात.

**गुण्डो०**—थांबा, थांबा, जिवन्तपणीं भुतं होऊं पहाणाऱ्या भामट्यांनो, तुम्हांला ठार मारून खरोखरीचींच भुतं करतों. धरा बांधा रे यांना, आणि यथेच्छ झोडपा हरामखोरांना. काका, काकू, ही आपल्या पुंडलिकरावांची जिवलग मित्रमंडळी बरं का.

[ त्यांना मारतात.

**लिंबाजी०**—( झाडावरून ) भली झाली. भली झाली. कशी गुलामांची खोड मोडली. पण मी कसा अचानक बचावलों ? तरी म्हणावं लिंबाजी पाटील.

**गुण्डो०**—राम राम पाटील. मुकाट्यानं खालीं येतां, कीं आम्हीं वर यावं तुमचा समाचार घ्यायला ?

**लिंबाजी**—येतों बाबा, पण मला मारूं नको. मी चुकलों, झक मारली, शेण खाल्लं आणि गप्प बसायचं सोडून नको तें बडबडलों.

[ लिंबाजी पाटलास झाडावरून खालीं ओढून मारतात.

**गुण्डो०**—बरं आहे. वहिनी, चला आतां घरीं आणि पुनः कधीं इकडे येत जाऊं नका बरं.

**जखाई**—भाऊजी, मी तुमच्या पायां पडतें. या मांगांनीं माझं नाक कापायचा विचार केला होता, पण ऐन वेळीं तुम्ही येऊन माझी लाज राखलीत.

**गुण्डो०**—छे, छे, हे सर्व काका-काकूंचे उपकार बरं. तुमचं रक्षण करण्याचं सर्व श्रेय त्यांच्याकडे आहे, तेव्हां त्यांचे पाय धरा. कां ? नाक कां मुरडलंत ? वहिनी, वडील माणसांचे पाय धरायला इतका ताठा हवा कशाला ?

[ जखाई नाखुषीनें सासुसासऱ्यांच्या पायां पडते.

**सत्य**—अष्टपुत्रा सौभाग्यवती हो. देव तुझं कल्याण करो.

**गुंडो०**—वहिनी, बोलूं नये पण बोलणं येतं. तुमच्यासारख्या तरण्याताठ्या बायकांना, शिरावर नवरा असतां, हे नसते नेमधर्म हवेत कशाला ? अहो, ताईत, दोरे, अंगारे, धुपारे करून जर मनोरथ पूर्ण होते, तर देवर्षी कां भीक मागते ? या वडपिंपळांच्या सेवेनं जर मुलं व्हायला लागलीं, तर नवऱ्यांची गरजच नाहीं उरली. संततीकरितां बायका जर वडपिंपळाचे पार झिजवायला लागल्या, तर पुरुषांनीं चिंच-बाभळींनाच आलिंगन दिलं पाहिजे. अहो, तुम्हांसारख्या

भोळ्या बायकांना फसविण्याकरतांच असल्या ढोंगी लोकांचं हें कारस्थान असतं. बरं, चला आतां घरीं. चला रे भामट्यांनों.

[ जाऊं लागतात, पुंडलीक येतो.

**पुंड०**—अं ? हें रे काय ? तुम्ही खरोखरच माझे मित्र आहां कीं मरून त्यांचीं भुतं बनलां आहांत ? अँ ? काय झालं काय ?

**चम०**—( कांगावा करून ) काय झालं ? काय झालं ? काय झालं ? अहो महाराज, ही आपली दोस्ती नडली, दोस्ती !

**लिंबाजी**—( स्वगत ) नाहीं रांडे, ही तुझी मस्ती भोंवली, मस्ती.

**पुंड०**—हें पहा, असें कातावूं नका. सर्व नीट सांगा.

**चम०**—पुंडलीकराव, आम्ही आपले मार खाऊन पळत सुटलों होतों. तोंच ओसरीवर तुमचे आईबाप आम्हांला भेटले. आणि आमची हकीकत ऐकून घेऊन म्हणाले, आमची सून अशीच द्वाड आहे, आम्हांलाहि ती फार छळते, आणि तुम्हांलाहि मारलं; तेव्हां भुतांचीं सोंगें घेऊन पिंपळाच्या पारावर बसा आणि ती प्रदक्षणेला आली कीं, किंकाळ्या मारून तिला घाबरवा म्हणजे आम्ही येऊन तिला झोड झोड झोडूं नि तिची खोडच मोडूं.

**कांळ्या**—पुन राव, आम्ही पडलों तुमचे मैतर, तवां तुमचं आईबाप तुमच्या बायकूला जर माराया लागलं, तर आपुन सोडवावं म्हुन आमी समदं आलों; अन् आल्यावर तुमच्या आईबापांनीं सांगितलं, म्हुन जरासी किंकाळी मारली झालं.

**लिंबाजी**—(स्वगत) कसे एकापेक्षां एक बेरड आहेत ! याला म्हणतात चोरांच्या उलट्या बोंबा !

**जखाई**—अगबाई ! तर मग या थेरडा-थेरडीचं कां हें कारस्थान ? शर्थ झाली बाई दुष्टाव्याची. बोलणीं मानभाव्याचीं नि करणी कसायाची बरं ही !

**पुंड०**—काय हो थेरडोपंत, काय सांगताहेत हे तुमचे वडील नि या तुमच्या मातुश्री ?

**जन्हु०**—बाळा पुंडलिका, खाटकालाहि न शोभणारं कृत्य आम्ही करूं असं तुला वाटतं का ?

**पुंड०**—खात्रीनं वाटतं ! या म्हातारचळामध्यें तुम्ही काय वाटेल तें कराल. मुळापासून हिच्यावर तुमचा कटाक्ष. तरी बरं, ती तुमच्या वाटेस कधीं जात नाहीं कीं, कधीं वेडावांकडा शब्द बोलत नाहीं. मनापासून ती तुमचं कल्याण चिंतून सेवा-चाकरी करते ! त्याचे उपकार असे फेडतां होय मांगांनो ?

**जखाई**—खरं हो. एखादी कजाग सून असती, तर तिनं अशा सासूसासऱ्यांना दिवसांतून शंभर वेळां चव्हाट्यावर आणलं असतं.

**सत्य०**—(स्वगत) आणि ही कमीच करते ! ( उघड ) बरं बाई, काय म्हणाल तें खरं. पण आम्ही देवाची शपथ घेऊन सांगतों कीं, रात्रीं तूं यांना मारलंस, म्हणून हेच उलट तुझा सूड उगवणार होते.

**पुंड०**—छट, ते असं कधीं करणार नाहींत. ही नायकीण झाली, म्हणून असल्या खोट्या कर्मांत कधींहि सामील होणार नाहीं. काय हो चमकजी ?

**चम०**—होय तर. यांनींच मला इडळ व्हायला सांगितलं आणि उलट मलाच गुरासारखं मारलं हो.

**जन्हु०**—बाई, माझ्या साऱ्या जन्मांत मी तुला आजच पाहतों आणि मी तुला भेटलों कधीं आणि इडळ व्हायला सांगितलं कधीं ? बाळा पुंडलिका, यांचं ऐकून तूं आम्हांला दोष देऊं नको. तुला खोटं वाटत असेल, तर त्या भल्या माणसाला विचार. त्यानंच आम्हांला यांच्या क्रूर कर्मांबद्दल बातमी दिली.

**लिंबाजी**—आलं रे बाबा अंगाशीं ! ऊं:, आतां आपणहि आपली पगडी फिरवावी. ( उघड ) मीं हो कधीं तुम्हांला बातमी दिली ? काय म्हातारा लबाड आहे हो ! भले शाबास ! या उतार वयांत खोटं बोलून माझ्यासारख्या गरीब साध्याभोळ्या माणसाला फशीं पाडतां ? वा ! सभ्यच दिसतां हो !

**जन्हु०**—कसे एकापेक्षां एक सवाई बिलंदर आहेत ? नशीब ! रामा, तूं साक्ष आहेस रे बाबा ! चल ग चल घरीं.

**पुंड०**—आतां विसरा घर. चालले आपल्या बापाच्या घरीं. आतांच्या आतां इथून तोंड काळं करा. नाहीं तर एकेकाचा खून करीन. काळूराम, एक मोठासा दगड आण. या थेरडाथेरडीचा कपाळमोक्षच करतों.

**सत्य०**—तर मग बाबा, पहिल्यानं तो दगड माझ्या डोक्यांत घाल. पुत्राच्या हातून तसा नाहीं तर असा मोक्ष मिळूं दे. तुला जन्म दिला; तें पाप अशानं तरी नाहींसं होऊं दे.

**जन्हु०**—हर हर ! कलिपुरुषा तर मग सर्व जगभर तुझंच साम्राज्य सुरू झालं म्हणायचं. सत्वरजगुणाला अटकेंत ठेवून, तमोगुणानंच तुझं प्रधानपद स्वीकारलं काय ? सुविचार सुळावर देऊन, अविचार तुझा सेनापति झाला ना ? हाय हाय ! मातृपितृभक्तीचा खून करून, सर्व जगभर अश्रद्धा थय थय नाचूं लागली. शत्रु ते मित्र आणि आप्त ते शत्रु होऊन, निर्मल प्रेमाला हद्दपार केलं. भगवंता, नको आतां हा प्राण. या जगाचा मला वीट आला. पुत्र जन्मदात्यांवर फिरला, यापेक्षां जगाची क्रांति कलिपुरुष अधिक ती काय करणार ? झालं, सर्व सोहळे पुरले. आतां, देवा, तुझ्याच पायांजवळ ने.

**पुंड०**—काय रे, मी तुमच्याजवळ दगड मागतों आहें ना ! आणा लवकर म्हणजे या दोघांना देवाच्या पायाजवळ त्याच्या लाथा खायला पाठवितों.

**सत्य०**—तथास्तु ! बाबांनो, द्या त्याला दगड. तो आपल्या जन्मदात्यांना ठार मारून देवाजवळ पाठवितो आहे. या सत्कर्माच्या आड तुम्ही कशाला येतां ? बाळा, होऊं दे बरं तुझ्या मनासारखं.

**पुंड०**—काय करूं रे ? या वेळीं मला इतका संताप आला आहे कीं, यांच्या नरडीचा घोट घ्यावा–पण आईबाप पडले. निघा–निघा इथून. जन्माचं तोंड काळं करा.

**जन्हु०**—जातों बाबा. पण आम्हांला थोडं खर्चाला दे म्हणजे आम्ही काशी-यात्रा करतों.

**पुंड०**—काशी करा, नाहीं तर फांशी जा. एक कवडीसुद्धां तुम्हाला मिळणार नाहीं.

**सत्य०**—तर मग वाटेंत आमचं कसं होईल ? आम्हीं कसं जावं ? काय खावं ? कुठं रहावं ?

**पुंड०**—मसणांव रहावं; शेण खावं, तें न मिळाल्यास, गळाभर खड्डा खणून त्यांत पुरून घ्यावं, आणि आकाशाकडे डोळे करून मरून.जावं–समजलीस ? जा आतां माझ्या डोळ्यांसमोर दिसूं नका. तुमचीं तोंड पाहून माझा इतका संताप होतो आहे कीं, कदाचित् माझा प्राणहि जाईल.

**जन्हु०**—नको बाबा, देव तुला शतायुष्य देवो. काय व्हायचं तें आमचं होऊं दे. बरं थंडीवाऱ्याकरितां, थोडीं चिरगुटं आणि भीक मागायला एखादी तपेली तरी आम्हांला दे.

**पुंड०**—कांहीं नको. रस्त्यामध्यें करवंट्या पुष्कळ सांपडतील. व्हा चालते. जास्त वेळ उभे रहाल, तर अंगावरचे कपडेहि हिसकावून घेऊन, थेरड्या, तुला लंगोटी आणि ए हडळी, तुला नेसायला तरट देईन समजलीस !

**सत्य०**—देवा, यापेक्षां आमचे कान फोडशील तर बरं ! बाळा, तुझं नऊ महिने ओझं वाहून मीं तुला जन्म दिला—

**पुंड०**—कांहीं उपकार नाहीं केलेस.

**सत्य०**—न्हाऊं माखूं घालून कडेखांद्यावर खेळवला-

**पुंड०**—आपलं कर्तव्य केलंस.

**सत्य०**—तुला जीव लावून लहानाचा मोठा केला-

**पुंड०**—बालहत्येंतून सुटलीस. त्याचं काय एवढं ?

**सत्य०**—तुझ्याकरितां मीं आजपर्यंत पुष्कळ खस्ता काढल्या—

**पुंड०**—झक मारलीस. सांगितलं होतं कुणी ?

**सत्य०**—हें सर्व केलं, तें असे शब्द ऐकून घ्यायला का रे ?

**पुंड०**—जखिणी—ऐकून घ्यायला नव्हे तर प्रत्यक्ष भोगायला.

**जन्हु०**—अरे अरे अरे ! पुंडलिका हें बरोबर नव्हे. अरे लहानपणीं तिच्याशिवाय तुला करमत नव्हतं.

**पुंड०**—नसेल. आतां काय त्याचं ?

**जन्हु०**—तूं निरोगी राहवंस म्हणून तिनं आवडीचे पदार्थ खाऊं नयेत, नेहमीं पथ्य करावं . तुला सुखं व्हावं, म्हणून तिनं धड झोंपहि घेऊं नये, सदा सर्वदा मांडीवर घेऊन गाणं गात थोपटीत असावं, तुला जराहि दुखवूं नये.

**पुंड०**—नसेल. त्याबद्दल लोकांनीं तुम्हांला दयाळू म्हटलं असेल.

**जन्हु०**—' माझं बाळ—माझं बाळ ' म्हणून तुझं कौतुक करावं.

**पुंड०**—संभवनीय आहे. कुणीहि कौतुक करावं असाच मी आहें.

**जन्हु०**—तिचं नांव घेऊन तूं आक्रोश केलास, म्हणजे तिनं तुला प्रेमानं मांडीवर घेऊन स्तनपान करवावं.

**पुंड०**--शक्य आहे. त्या दुधाला कांहीं पैसे पडत नाहींस. फुकटचंच तें.

**सत्य०**—बाळा, लहानपणीं जेव्हां जेव्हां 'आई, आई' म्हणून माझें नांव घेऊन रडत होतास--

**पुंड०**--तर मग अवदसे, लहानपणीं मीं तुझ्या नांवानं रडलों, आतां माझ्या नांवानं तूं रड जा.

**जन्हु०**--शिव शिव! काळच फिरला, तिथं काय बोलायचं ? मुलाला आई-बाप जड झाले. कृतघ्नतेनं उपकाराचं तोंड काळं केलं. दयामाया नाहींशी करून त्यांची जागा निर्दयतेनं बळकाविली. नम्रपणाला उन्मत्तमणानं हांकून लावलं. मधुर वाणीच्या छातीवर कठोर वाणीनं पाय दिला. बाळा, थोडी तरी आमची दया येऊं दे.

**पुंड०**--दया पेटींत बंद करून ठेविली आहे.

**सत्य०**—अरे, कांहीं तरी न्याय पहा.

**पुंड०**—न्याय धाब्यावर बसाविला आहे.

**जन्हु**—थोडा विचार करा.

**पुंड०**—विचार संचार करायला गेला आहे.

**सत्य०**—जरा पाहुण्याची भीति धर.

**पुंड०**—भीति भागुबाईकडे सोंपविली आहे.

**जन्हु०**—हरहर! तर मग अधमपणाचा कहर झाला.

**पुंड०**—मला अधम म्हणणाऱ्या म्हाताऱ्या कुत्र्या-निघ येथून--

**फिरुनी कधीं सदनीं न या जा तोंडें लपवुनी ॥**

**जन्हु०—बोल तुझे काळजा भेदिताती ॥**

**पुंड०—फुटो तुटो नच पर्वा मुख कृष्ण करा येथुनी ॥**

**जन्हु०—तुजाविण आम्हांला नसे कुणी गति न जमीं या ॥**

पुंड०—ही मनधरणी, वरकरणी, दिसते
नच ये करुणा मन्मनीं ॥

जन्हु०—वृद्धपण तरि पाहीं ॥

पुंड—मस्तपणा ये देहीं ॥—

जन्हु०—निंदूं तरि नको बा ॥ अरे तूं मारूं तरि नको बा ॥
शांति मनीं धरिं ॥ भ्रांति त्यजीं तरि ॥

पुंड०—यत्किंचित मज खंत नसे मी देतों हांकुनी ॥



# अंक दुसरा



## प्रवेश पहिला

( पुंडलिकाचे घरीं मंडळी जुगार खेळत बसली आहे. )

**पुंड०**—चमकाजी, आडवे बारा.

**चम०**—छेः वांकडे तेरा ! आणि ते शेवटचे पैसे इकडे सारा.

**मोहन**—पुंडलीकराव, आतां काय लावतां पणाला ? बारा टाकून घराचे बारा वाजवलेत. सहा टाकून पैशांचा स्वाहा केलांत. आतां काय राहिलं ?

**पुंड०**—बायकोच्या अंगावरचे दागिने.

**काळ्या**—थतं तरी काय उरलं हाई ? नाक उडवतां उडवतां नथनी जी उडाली, ती चमकाजीच्या नाकांत बसली. गोटपाटल्या ज्या सटकल्या, त्या चमकाजीच्या हातांत लटकल्या. सरी ठुशिनंबी चमकाजीचंच नरडं पकडलं. आतां राहिलं काय ?

**पुंड०**—अरे, जें खिडुकमिडुक असेल तें. पण अखेरपर्यंत खेळायचा माझा बाणा आहे.

**लिंबाजी**—त्याशिवाय अखेर व्हायची नाहीं, ( स्वगत ) जुगारांत लागली ईर्षा कीं, तिनं उडवलाच सर्वस्वाचा फडशा.

**लंबोदर**—( प्रवेश करून ) ए, घरामदीं कुन हे ? पुंडलीकराव हे काय ?

**पुंड०**—कोण ? लंबोदरशेट ? या—या बसा.

**लंबो०**—अरे बसाला कुण लेकाला फुरसत हे ? हामची बाकी चुकती करूनशी टाकनी बाबा.

**पुंड०**—इतकंच ना ? मग मी कुठं पळून गेलों कीं काय ?

**लंबो०**—पळूनशी कशाला जायेल ? अने पळून गेले, तर सरकारला सांगून बांधूनशी नाय आणेल ? पुंडलीकराव, हे वार्ता नको करा, हामचा तांदुळाचा पैशा द्यानी बाबा.

**पुंड०**—बरं आहे, उद्यां येऊन आपले पैसे घेऊन जा.

**लंबो०**—अरे, तमचा उंद्या उंद्या तो खळास होतेच नाय. त्रण महिना झाला, आमचा माणस तमच्या घरला आवते, पण तमचा उंद्या उंद्या चाललाच हाय. तेसाठीं बाबा आतां हामी पोते आला, तवा बाकी देऊनशी टाकनी शेणा माणस.

**पुंड०**—अहो, पण माझ्या पतीबद्दल तुमची खात्री आहे ना ?

**लंबो०**—अरे चुलामंदी गेला तमचा पती. तमचा पती हामाला काय करायचा हाय ? शमदा लोग बोलतो के, तमे लई पाजी माणस झाला. डोकरा-डोकरीला घरामंदशी घालवून दिला. अने ये लुच्चे लोगला ने गंडा लोगला घरमंदी टेवले.

**काळ्या**—ये तांदुळडाळीच्या, तोंड सांभाळ नाय तर दाविन माझा हिस्का.

**लंबो०**—मसणमां गया तारा हिस्का. पुंडलीकराव, हामी आणखी असाबी ऐकते के, ए हरामखोरच्या शंगती तमे जुगार खेळते, तमाशा करते, नायकण लोकच्या घेरला दारवा पिऊनशी पडते, नाय खावा ते खाते; ये तमचा गारवाबानी काम बगुनशी हामी विश्वास केम धरेल अने कशा करेल ?

**पुंड०**—बरं बाबा, पण भलतं सलतं बोलून अब्रू घेऊं नका.

**लंबो०**—तमचा अब्रू हामाला कशाला पायजे !

**पुंड०**—अहो पण मोठ्यानं तरी बोलूं नका.

**लंबो०**—( ओरडून ) मोटानी कसा नाय बोलेल ? हामचा पैसा आपनी अब्रूचा माणस. तमे शमदा अब्रूवालाज छे.

**मोह०**—ए वाणगटा, कोणाची अब्रू काढतोस रे ?

**लंबो०**—कणाला वाणगट बोलतो, शोनारडा ? जा जा. लोगचा गळा कापूनशी हरामची सोना चांदी खा जा.

**पुंड०**—जाऊं द्या हो शेटजी, मी तुम्हांला एका चांगल्या माणसाचा हवाला देतों.

**लंबो०—चांगला ? भला माणसचा ? चांगला बेपारी माणसचा ?**

**पुंड०**—हुं चमकाजी, जरा या शेटजीचं तोंड बंद करा बरं.

**लंबो०**—अरे ! येज काय तमचा चांगला, भला, बेपारी माणस ? अरे, ये तर शाली रांड बाजारमंदी बेशते.

**चम०**—आणि तुम्ही देवळांत बसतां वाटतं ! तुम्हीं सुद्धां बाजारांतच बसतां.

**लंबो०**—शोदी नायकण, हामी बेपार करायला बेसते.

**चम०**—मग ? मी कांहीं चोऱ्या नाहीं करीत. मीसुद्धां बेपारच करतें.

**लिंबाजी**—हो ! यासुद्धां व्यापारच करितात. पण फक्त ठेवी ठेवायचा.

**लंबो०**—अरे खाड्यामंदी गेला इचा बेपार. लुत्सी रांड ! चांगला लोगच्या पोरालोगचा खराब करते—अने बोलते बेपार करते ! जा जा. मोढाला रंग लाऊनशी किडकीमंदी बेश जा.

**पुंड०**—शेटजी, त्यांना नका बोलूं. मी तुमच्या पाया पडतों.

**लंबो०**—हामच्या कशाला पाया पडते ? ये तमच्या भला नायकणच्या पाव धरूनशी हामचा पैशा आणनी बाबा.

**पुंड०**—हें पहा, कांहीं तरी उलाढाल करून, मी तुमची बाकी उद्यां चुकवितों. देवाची शपथ, आईची शपथ, तुमची शपथ, या यज्ञोपविताची शपथ. फार तर काय—या चमकाजीच्या गळ्याची शपथ.

**लंबो०**—अरे, जह्ला रांडाचा गला. ये नायकणच्या गलाला लागूनशी तर तुमच्यावाणी माशा मरून जाते. पुंडलीकराव, तमे काय गारवा झाले ? अरे, ए रांडलोक म्हणजे केरकचरा, घाण, विंछू—शापवाळी धरमशाळा राते. त्यंच्यामंदीं तमच्यासारख्या लोगांनीं जावा नाय. इजा होयल.

**पुंड०**—अरे हो रे बाबा, पण आतां तूं जा ना एकदांचा.

**लंबो०**—ये वखताला जाते. पण उंद्या शामदा पैशा नाय येल, तर तमाला नी ये चोर माणसाला बिन्‌भाड्याच्या घरामंदी बेसवेल.

**काळ्या**—बर व्हय व्हय. झोटा आलाय बिन्‌भाड्याचा. आमी कंदीं बिनभाड्याचं घर पगितलं न्हाई, कीं थतं कसं जात्याती ते आमास्नी ठावं न्हाई,

का आमीं कंदीं गेलोंच नाय ? म्हुन–तूं तुरडाळीच्या, आमास्नी घालवाया होवास ?

**लंबो०**—ए आडनाडी नांगऱ्या, लई गमजा करेल, तर दांतान् दांत पाडेल.

**काळ्या**—मंग आमीबी अस्सा कान उपटून देल. [ कान उपटतो

**लंबो०**—ए घेलसप्पा, एक वखत हामी तुला माफ करते, जा. दुसरं वखत उपट बगूं, मंग दावते. ( पुनः कान उपटतो. ) अरे, आमाला मारले, हामचा खूण झाले.

**जखाई**—( प्रवेश करून ) अगबाई ! मारामारी कुणाची नी खून कुणाचा ?

**लंबो०**—हामचा–हामचा–खूण झाले. आम्ही मेले–आमचा जीव गेले.

**पुंड०**—अग, खून नाहीं आणि कांहीं नाहीं. सहज गम्मत केली झालं. पैशाकरितां उद्यां ये म्हणून त्याला सांगितलं.

**जखाई**—मग ? असं नरडं दाबून का सांगायचं ? उद्यां त्यानं धान्य बंद केलं, तर काय धूळ खायची ? शेटजी, तुम्ही जा आतां.

**लंबो०**—जायला तर हे रावशाबांनीं शांगितला, त्येचामंदी तुम्ही काय हामचा न्याव तोडले ?

**जखाई**—अहो, तुमचे पैसे मी उद्यां पोचते करवीन. बरं; जा आतां.

**लंबो०**—बाईशाब, ये वखत तुमच्याकडे बघूनशी जाते. उंद्या जर पैसा नाय येल, तर तमचा रावशाबला बिनभाड्याचा घर हामी दावेल. मंग तुम्ही रडेल. दनामंदी ठेवा. [ जातो.

**पुंड०**—चला. पीडा गेली. आतां तूं जा घरांत आणि जरा चांगलसं फराळाचं तयार कर. माझे चार भले मित्र आज फराळाला यायचे आहेत, तेव्हां साखरपोळीचा बेत ठेव.

**जखाई**—जळला तो फराळ नी चुलींत गेली ती फराळ करणारांचीं तोंडं. तुमच्या जिवाला कांहीं तरी वाटतं का ?

**लक्ष न संसारीं ॥ लज्जा विकली तुम्हि सारी ॥ साखरपोळ्या विसरा आतां मागा माधुकरी ॥ जळो जळो ही गुलजारी ॥ हिनें आणिली बेजारी ॥ कर्मदरिद्री म्हणती हंसती थुकती शेजारी ॥ गमविली सरदारी ॥ आली नाशिबीं नादारी ॥ घरोघरीं मी फिरतें परि कुणि उभी न करि दारीं ॥ खिडुक-मिडुक दोरी ॥ टाकिलि वाण्याच्या द्वारीं ॥ केली लंका आतां विकुं का तुम्हांस बाजारीं ॥**

तरी तुम्हांला लाज कशी वाटेना? अहो, 'खायला नाहीं दाणा नी घरांत बोलावतां पाहुणा.' मेली सकाळची वेळ शेजारच्या सखूबाईकडून उसनंपासनं आणून भागवली; पण आतां संध्याकाळची काय वाट ?

**पुंड०**—सकाळीं सखूबाईकडून भागवलंस ना? आतां ठकूबाईकडून भागीव. उद्यांचं उद्यां.

**जखाई**—उद्यांचं उद्यां! देवा, कायरे माझ्या नशिबीं हे हाल. सासूसासऱ्यांची वाट लागल्यावर, मी सुखानं राज्य करीन, हे माझे मनांतले मांडे राहिले मनांत नी फजिती होणार जनांत.

**पुंड०**—अंः त्यांत काय मोठंसं.

**जखाई**—हो, त्याचं काय मोठंसं! मी मात्र सकाळ-संध्याकाळ चुलींत तोंड खुपसावं, पाणी भरावं, धुणीं धुवावीं, दिवसरात्र मेलं मोलकरणीसारखं राबावं, याचं तुम्हाला कांहीं आहे का!

**पुंड०**—अग, पण आई बाबा जेव्हां सर्व घरकाम करीत होते, तेव्हां तूंच ना म्हणत होतीस कीं, घरकाम मी तेव्हांच करीन, त्यांत काय आहे? यांत काय आहे! मग आतां कुंथायला कां लागलीस?

**जखाई**—बरं बरं. उसनं नको फेडायला. माझ्या सासूसासऱ्यांच्या जिवावर (रडते) मी पाटावरून ताटावर नी ताटावरून पलंगावर बसत होतें, पण आतां तुमच्या राज्यांत—

**पुंड०**—राणीसारखी वावरतेस.

**जखाई**—चुलींत गेली ती राणी. राजेसाहेब, हातानं बनवलेली ओलीकोरडी भाकर डोळ्यांतल्या पाण्याशीं या राणीला खावी लागते बरं.

**पुंड०**—चाललंच आहे. राणीसाहेब एखादे दिवशी दूधखवा, तर एखादे दिवशी नुसतीच हवा. पण ए, आतां काळजी करूं नकोस. माझे हल्लीं पैसे मिळविण्याचे धंदे सुरूच आहेत.

**जखाई**—जळले तुमचे धंदे. 'घांसभर अन्न नाही घरांत नी सावकार बसतात दारांत'–आणि म्हणे धंदे सुरू आहेत.

**पुंड०**—अंः! एकदां माझ्या मनासारखा डाव पडूं दे कीं, सगळ्या सावकार लोकांचीं थोबाडं बंद करतों. मग घरांत लांकडं म्हणूं नकोस, गोवऱ्या म्हणूं नकोस—

**जखाई**—माती म्हणूं नकोस, धोंडे म्हणूं नकोस, कांहीं म्हणूं नकोस. इथून तिथून उजाड घर. पण मी म्हणतें डाव डाव जे म्हणतां, ते आहेत तरी कसले नी पडायाचे आहेत तरी कुठून ?

**पुंड०**—अग फाशांतून.

**जखाई**—म्हणजे ? जुगार खेळतां कीं काय ?

**पुंड०**—छेः छेः संभावित लोकांकरितां, ही जुगारीची सुधारलेली नवी आवृत्ति आहे.

**जखाई**—हं. तर मग लौकरच घरादाराचं वाटोळं होणार बरं. आणि जोडीला हे मेले उपटसुंभ नी ही वेस्वा असेल ? अहो, या खादाडांनीं 'आंवळा देऊन कोहळा काढावयाची' मसलत कशी केली आहे, हें अजून तुमच्या ध्यानीं येत नाहीं ना ? शर्थ झाली बाई या भोळेपणाची ! थांबा हं. या तुकडमोड्यांची मीच चांगली 'खा खा' जिरवतें.

**मोहन**—बाईसाहेब, तें विसरा आतां—

**चम०**—आणि जरा तोंड आवरून बोला.

**जखाई**—ओरडूं नका ! पाठीवरचे झाडूचे वळ बुजले वाटतं ? डाकिणी, चल हो माझ्या घराबाहेर.

**पुंड०**—अग, पण गप्प रहा. परक्या माणसांवर असं काय तोंड सोडावं ? तूं जा घरांत.

**जखाई**—कां-मी शेणामेणाची-उसनी आणलेली बायको आहे ? म्हणून या बाजारबसवीपुढें गप्प राहूं नी घरांत जाऊं !

**लिंबाजी**—हें काय हो पुंडलीकराव ! तुम्ही आपल्या बायकोच्या तोंडाला हात घाल कीं नाहीं ? आमच्या चमकाजीला आडव्यातिडव्या शिव्या देणं म्हणजे काय ?

**जखाई**—अरे मेल्या सुडक्या, शिव्याच काय पण मी तिचा प्राण घेईन. तुझी रांड जर लाडकी असेल, तर डोक्यावर घेऊन घरीं बैस. काय ग टवळे, तोंड पाहात काय उभी राहिलीस ? जातेस कीं, लाथ मारून घालवूं ?

**चम०**—खबरदार टवळे बिवळे म्हणाल तर. आजपर्यंत ऐकून घेतलं, पण आतां झिंज्या धरून घराबाहेर काढीन, समजलांत ? हें घर माझें आहे.

**जखाई**—तुझ्या बडलाचं आहे !

**चम०**—तेंहि समजेल. बाईसाहेब, तुमचे यजमान जुगारींत हरल्यामुळें हें सगळं घरदार नि मालमत्ता, त्यांनीं माझ्या नांवानं लिहून दिली आहे.

**जखाई**—ते लिहून देणारे एक शहाणे नि तूं लिहून घेणारी सात शहाणी. मी कुणाचं ऐकणार नाहीं.

**चम०**—मुकाट्यानं ऐकावं लागेल. पाहिजे तर विचारा आपल्या नवरोजींना.

**जखाई**—होय का हो ? या सटवाईला हें घरदार लिहून दिलं आहे ? अं ! बोलत कां नाहीं ? असे घुसळखांबासारखे उभे कां ? ही अवदसा काय म्हणते तें ऐकलं का ?

**पुंड०**—ऐकलं-ऐकलं-ऐकलं !

**जखाई**—तर मग सांगा, सांगा, सांगा ! हें घर माझं कीं हिच्या बापाचं.

**पुंड०**—तुझंहि नव्हे आणि तिच्या बापाचं नव्हे. हें घर माझं आहे.

**जखाई**—अस्सं. झाली खात्री ? माहामारीबाई, जा आतां बाहेर.

**चम०**—काय हो राजेश्री, गेलांत का वळणावर ? हा तुमच्या हातचा दस्तऐवज आहे, कीं शाळेतलं खरडं आहे ?

**मोहना०**—हीं तुमच्या हातचीं अक्षरें आहेत कीं, कुत्र्यामांजराचे पाय आहेत ?

**काळ्या**—हें तुमचं त्वांड हाये का तोबरा हाये ? बोलल्यालं समदं इसरला जनू.

**पुंड०**—अहो, पण जुगारींत फसवून घेतलेला लेख कधीं तरी खरा ठरतो का ? बोलून चालून ती फसवणूक.

**चम०**—अस्सं काय ? तर मग काळूरामजी, गूळखोबऱ्यावर फसलेलं हें बाळ चावडीवर नेऊनच ताळ्यावर आणलं पाहिजे. महाराज, बायकोला घेऊन मुकाट्यानं घराबाहेर होता कीं, चावडीची हवा खातां ?

**पुंड०**—काय ग, आतां कसं करायचं ?

**जखाई**—मोठ्यानं गळा काढून रडायचं ! मी नाहीं कुणाच्या बापाला घरांतून बाहेर निघणार—मी या घराची मालकीण आहे.

**चम०**—मोहनशेट, या मालकीणबाई अन हे मेले फाजील मालक अशानं नाहीं वटणीला यायचे. चावडीवर धांवत जा, माझं नांव सांगा, नी पाटील-साहेबांनाच इकडे घेऊन या पाहूं.

**काळ्या**—तेंबी खरंच. पाटलाचा दट्या दावला कीं, तवांच ताळ्यावर येत्याल. चला मोहनशेट. .

**पुंड०**—चमकाजी, जरा इकडे या, तुम्हांला एक गोष्ट सांगतों.

**चम०**—तुमच्या बायकोलाच सांगा गोष्ट. आजपर्यंत मीं पुष्कळ गोष्टी ऐकल्या आहेत.

**पुंड०**—हें काय बरं चमकाजी ? मीं तुमचे इतके लाड पुरवले—

**चम०**—आपल्या सुखासाठीं पुरवलेत. माझ्यावर उपकार नाहीं केलेत !

**पुंड०**—बरं. पण तुझ्यावर विश्वास ठेवून बसलों असतां मी दरिद्री झालों, म्हणून तूं मला घरांतून हांकून लावतेस, हा न्याय झाला का ?

**चम०**—न्याय राहिला चावडीवर. आम्हां कसबिणींचा धन्दाच असा. दरिद्री झालेले यजमान जर आम्ही घरांत बाळगूं लागलों, तर अशा भिकारी यजमानांची एक दावणच होईल.

**जखाई**—कां ? आतां कां वाचा बसली ? तेव्हां आईबापांच्या अंगावर कुत्र्यासारखे गुर्रगुर्र करून गुरगुरत होतां आणि आतां हें हें रांडरू-इतकं टाकून बोलतं, तर गाईसारखी खालीं मान घालून ऐकून घेतां, याची तिळभर तरी लाज ? जुगारींत हरलेलं या मटवाईला द्यायला, तुम्ही धर्मराजाचा अवतार घेतलांत कीं काय ?

**चम०**—होय बरं पांचाळीबाई, धर्मराजाचा अवतार घेतला. आतां आमचे पाटीलसाहेब आले कीं लौकरच तुमच्या वनवासाची तयारी करतील.

**पुंड०**—तर मग चमकाजी, तुम्ही आम्हांला घराबाहेर काढणारच ?

**चम०**—अजून शंका असल्यास तुम्हांला मूर्खच म्हटलं पाहिजे !

**पुंड०**—एकूण तुम्ही इतक्या निर्दय आहां तर !

**चम०**—तुमच्याजवळ आणखी पैसा असता, तर नसते निर्दय बनलें !

**पुंड०**—तर मग या सुन्दर रूपाच्या आंत अघोर कर्माची घाण भरली आहे म्हणायची ?

**लिंबाजी**—हें समजत नाहीं, म्हणूनच रंडीबाज लोकांना नंदीबैल म्हणतात.

**पुंड०**—अरे अरे अरे ! या कवडी किमतीच्या लोकांनीं शेवटीं मला नन्दी-बैल ठरवलं अं ?

**जखाई**—वेसण घालून घरोघर फिरवलं नाहीं, हें भाग्य समजा !

**पुंड०**—ठीकच आहे. शमीच्या आंत जसा अग्नि असतो त्याचप्रमाणं हिच्या सुन्दर शरीरांत कपट भरलं आहे; मग नकळत माझा सर्वस्वीं घात झाला, यांत नवल कसलं ? थंडीनं कांकडलेली ही जलाल नागीणच मीं घरांत आणली, मग तिनं उपकारकर्त्याला दंश केला, यांत आश्चर्य कसलं ?

**जखाई**—हें मी कधींच सांगत होतें कीं, ही अवदसा आपल्या घरांत नको म्हणून. पण ऐकतं कोण ? तिचं तें सुन्दर स्वरूप, खोटे झकपक कपडे, बनावट

हिऱ्यामोत्यांचे दागिने, हंसत गोड बोलणं, यांनीं जशी काय भुरळ पडली होती. ब्या आतां, तुमच्याच घरादाराची मालकीण बनलेल्या या महामायेचे लाथा खाणारे गुलाम व्हा, गुलाम.

**चम०**—बाई, आतां विनाकारण कां तडफडतां? आम्हीं नायकिणी अजीजी करून ज्या कुणाच्याहि घरांत शिरतों, त्या घरवाल्याचं कल्याण करायला नव्हे, तर आमचं, आमच्या नातलगांचं कल्याण व्हावं, चैन चालावी, नि मनाप्रमाणं जगांत वावरतां यावं म्हणून! आतां बऱ्या बोलानं, या आमच्या जुन्या यजमानाप्रमाणं नोकरचाकरांत पडून रहा, नाहीं तर धूळ खात वाटेल तिकडे चालते व्हा.

**पुंड०**—अग, पण कपटानं माझं घरदार जुगारींत जिंकून, त्यावर तूं हवी तशी चैन करावीस आणि तूं देशील तो भाकरीचा तुकडा चघळीत मीं इथं पडावं, हा कुठचा न्याय?

**चम०**—हा आम्हां नायकिणींच्या घरचा न्याय! रावसाहेब, तुमच्यापासून जुगारींत जें मी जिंकून घेतलं ते पुजून ठेवायला नव्हे; तर त्याच्यावर माझं खाणंपिणं, माझे विलास, माझे ऐषआराम चालावे याकरितां बरं!

**पुंड०**—तर मग आजपर्यंत गोडगोड बोललीस, थापा दिल्यास, तें सर्व व्यर्थच म्हणायचं?

**चम०**—यांत काय संशय! इतकंसुद्धां न समजण्याइतके तुम्ही अडाणी, मूर्ख असाल, असं मला वाटलं नव्हतं! तर मग आतां स्पष्ट सांगतें, मीं दिलेले शिळेपाके तुकडे जर खाववत नसतील, तर चारी वाटा तुम्हांला मोकळ्या आहेत.

**पुंड०**—किती बेमुर्वतखोरपणाचे हे शब्द! अग, पण आम्हीं एका वस्त्रानिशीं कुठं जावं? काय खावं? आणि काय करावं?

**चम०**—मसणांत जावं, शेण खावं, गळ्याइतका खळगा खणावा, त्यांत पुरून घ्यावं आणि आकाशाकडे तोंड करून खुशाल मरावं!

**लिंबा०**—छान, छान चमकाजी. आपल्या आईबापांना हांकून देतांना या राजश्रींनीं असंच सांगितलं होतं!

**पुंड०**—म्हणून तुम्ही मला तसं सांगतां होय?

**लिंबा०**—उघडच आहे. कुणालाही आपल्या वचनाची आठवण द्यावी! खरं कीं नाहीं चमकाजी?

**चम०**—अहो जशास तसं! केल्या कर्माचे झाडे या हातावरचे या हाताव इथल्या इथंच द्यावे लागतात, त्याचा हा एक चांगलाच मासला आहे.

**पुंड०**—अग पण मासलेवाईक रांडे, मीं जें केलं, तें तुझ्याच नादानं आणि तुला सुख व्हावं म्हणूनच!

**चम०**—आणि मीं केलं तें माझा धंदा म्हणून! तुमच्या संगतीनं मला कांहीं मोक्षाला जायचं नव्हतं. श्रीमंतांच्या तरुण मुलांना नादीं लावायचं, खोटं वरकरणी प्रेम दाखवायचं, काय असेल नसेल तें लुबाडायचं आणि कफल्लक झाले, म्हणजे असं हांकून द्यायचं; हा जो आम्हां नायकिणींचा व्यवहार, त्यांत मी कांहीं चुकलें कां?

**पुंड०**—मग आम्ही कशांत चुकलों?

**लिंबा०**—तें मी सांगतों. तुम्ही जातीचे ब्राह्मण असून, आपलं कर्म विसरलां, स्नानसंध्या सोडली, देवधर्म टाकला, पोथीपुराणें गुंडाळलीं, आईबापांना लाथेनं तुडविलं, बायकोला डोक्यावर चढविलं, खाऊ नये तें खाल्लं, करूं नये तें केलं आणि कुळाला बट्टा लावून घेतला,—यापेक्षां चुका किती सांगूं!

**चम०**—कशाला तोंड शिजवितां? याच्या चुका इतक्या भयंकर आहेत कीं, याला हजारों वर्षें नरकांत बुचकळत ठेवलं पाहिजे.

**पुंड०**—अग पण नरकाचे खाणी, हें सगळं करायला तूंच शिकवलंस ना?

**चम०**—पण तुमच्या अकलेचं काय खोबरं झालं होतं?

**लिंबा०**—का तुम्हांला भूत झोंबलं होतं?

**पुंड०**—दुसरं भूत कोणतं? हेंच भूत माझ्या बोकांडीं बसलं होतं!

**चम०**—मग अजून तें सुटलं कुठं! आपल्याला, तें भूत घरांतून बाहेर काढील, तेव्हांच बोकांडीचं उठेल!

**पुंड०**—तेंच मी पहातों. पंचाक्षरी, मांत्रिक कांहीं मेले नाहींत. येऊं द्या पाटील.

**चम०**—येऊं द्या, ( स्वगत ) त्यांना मी पानपट्टी, अत्तरगुलाब वगैरे वगैरे देऊन अगोदरच भारून ठेवलें आहे. ( उघड ) अगबाई ! आलेच ! यावं, यावं पाटीलसाहेब.

[ पाटील बसतो. आदरसत्काराचें प्रदर्शन करतात. पाटील खूष होऊन पुंडलिकाकडे रागानें पाहतो.

**पाटील**—हॅं हॅं–काय म्हणणं आहे चमकाजी !

**चम०**—हॅं हॅं–या पुंडलिकानं आपलं घरदार माझ्या स्वाधीन करून, आपल्या बायकोला घेऊन निघून जावं. कारण, त्यानं आपलं घरदार, मालमत्ता मला दिल्याबद्दल हें त्याच्या हातचं लिहिणं आहे.

**पाटील**—लिहिणं हें केव्हांही लिहिणंच आहे. तें पुसून टाकणं, म्हणजे अधिक गुन्ह्याला पात्र होणं. पुंडलिका, तुला या लिहिण्याप्रमाणं यांच्या स्वाधीन तुझं घरदार केलं पाहिजे.

**पुंड०**—अहो, पण मला फसवून तो कागद करून घेतला असेल तर ?

**पाटील**—बाबारे, फसवणं आणि फसणं हा मनुष्याचा धर्म आहे. तेव्हां धर्मशास्त्र असं सांगतं की, तूं सज्ञान असल्यामुळें फसला जाणं शक्य नाहीं.

**पुंड०**—( जवळ येऊन नम्रतेनें ) अहो, पण जुगारीच्या नादीं लावून यांनीं मला लुबाडलं असलं तर ?

**पाटील**—चूप–दूर उभा रहा.

**पुंड०**—मी दूर आणि चमकाजी जवळ ?

**काळ्या**—( स्वगत ) त्यो महिमाच काई न्यारा है !

**पाटील**—ती आमच्या मर्जीची गोष्ट आहे. ह्या बिचाऱ्या संभावित बायकोला गुन्हेगारांत ओढूं नकोस. तुझ्या जुगारीपणाबद्दल सगळा गांव साक्ष देईल. तरी पण तुझ्या हिताकरतां तुझा गुन्हा मी चारचौघांपुढं मांडीत नाहीं.

**पुंड०**—वाः ! माझ्या हिताकरतां म्हणण्यापेक्षां, जिनं तुमची दृष्टि चमकावली, त्या ह्या चमकाजीच्या प्रेमाकरतांच कां म्हणा ना ?

**चम०**—हें पाहिलंत ? मुद्दाम कुचकं बोलून तुमचं नांव बदनाम करतो आहे. ( लाडानें ) बाकी मी बायको कशी आहें, तुम्ही जाणतांच. तुमची माझी ओळख कांहीं नवीन नाहीं.

**काळ्या**—( स्वगत ) मागलीच हाये.

**पाटील**—त्याबद्दल माझी खात्री आहे. पुंडलिका, हें गैरशिस्त बोलणं, अपराध्यांनीं बोलतां कामा नये. अपराध्याचं भाषण पद्धतशीर असलं पाहिजे. तुझ्याशीं आतां हुज्जत घालीत बसायला मला वेळ नाहीं. यांच्या स्वाधीन मुकाट्यानं घरदार कर. नाहीं तर धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणं, जुगाऱ्याला मांगाकडून बांधवून, गांवाबाहेर हांकलून द्यावं लागेल.

**पुंड०**—अहो, पण माझ्याबरोबर जुगार खेळणाऱ्या या हडळीला निरपराधी ठरवून, माझं घर हिच्या स्वाधीन करतां आणि मला गांवाबाहेर जायला सांगतां, हें कुठलं धर्मशास्त्र ?

**पाटील**—पुंडलिका, शास्त्रामुळं धर्म असतो आणि धर्मामुळं शास्त्र असतं. बाबारे, शास्त्र करणारींहि माणसंच आणि धर्म मांगणारींहि माणसंच ! म्हणून त्यांची सांगड शास्त्रीपंडितांच्या मतानं नीट जुळवून, धर्माचं वर्म जाणून त्याप्रमाणं कर्म सांगावं लागतं. अरे, नळ धर्मराजासारखे सुद्धां या जुगारीच्या पायीं वनवासाला गेले, मग तुझी काय कथा ? अहो, तुमच्यापैकीं कुणी चावडीवर जाऊन चार मांग बोलवा; म्हणजे याची गाढवावर बसवून धिंड काढतां येईल.

**पुंड०**—मला गाढवावर बसवणार आणि या छिनाल, जुगारी रांडेला ?

**चम०**—माझी नको तुम्हाला काळजी. मी आपली पाटीलसाहेबांच्या घरीं सुद्धां बसेन. पण पण तुम्ही अगोदर घराबाहेर चालते व्हा.

**पुंड०**—पाहिलंस ना ? तूं या मंडळीला मारलंस, शिव्या दिल्यास म्हणून आज हा प्रसंग आला बरं.

**जखाई**—भले शाबास ! वड्याचं तेल वांग्यावर वाटतं ? या रांडामेल्यांना मी वरचेवर झोडपीत होतें, म्हणून तर इतके दिवस घरांत राहिलां; नाहीं तर यापूर्वीच आजच्यासारखी धिंडका निघाली असती.

**पुंड०**—तें जाऊं दे, पण तुझ्या नादानं जर आईबापांचा छळ करून त्यांना हांकून दिलं नसतं तर, अशा प्रसंगीं ते उपयोगी पडले असते !

**जखाई**—हा पहा उलटा न्याय ! त्यांना हांकून द्यायला मीं सांगितलं वाटतं ? आम्ही अल्लड बायका ! कांहीं तरी बोलतों, कांहीं तरी करतों, पण शहाण्या पुरुषांनीं बरं कोणतं, वाईट कोणतं, याचा विचार करूं नये ?

**पुंड०**—पण या तुझ्या तोफखान्यापुढं मला विचार करायला अवकाश मिळेल तेव्हां ना ?

**जखाई**—हं ! मी इतकी कानीं कपाळीं ओरडत असून, सगळ्या दोषाचं खापर माझ्याच डोक्यावर फुटलं ना ? फुटूं दे. देवा ! त्यापेक्षां मला मरण येईल तर बरं होईल.

**पुंड०**—नाहीं, मला मरण येईल तर बरं होईल.

**जखाई**—नाहीं मलाच.

**पुंड०**—बरं तसं कां होईना–तुलाच ! पण तूं आतां रडूं नकोस. मीच आपला गाढव.

**जखाई**—नाहीं, मीच गाढव.

**चम०**—पाटीलसाहेब, इथं जमलेल्यांत मोटा गाढव कोण, याची परीक्षा करण्याची का ही वेळ आहे? मला न्याय पाहिजे आणि तो तुम्हाला देतांहि येतो.

**पाटील**—हो, खरंच. पुंडलिका, आधी घराबाहेर निघा आणि मग गाढवांचे राजे कोण, याचा विचार करा.

**पुंड०**—हर हर ! एकूण जिला मीं आश्रय दिला आणि जिच्यासाठीं मी तनमनधनानं झिजलों, तिनंच माझ्याशी खोटीं कर्मे करून, माझंच घरदार बळकवावं अं ? पण आतां रडून काय होणार ? झालं तें होऊन गेलं ! पण सुंदर स्वरूपाचे मधुरभाषिणी डाकिणी, आधीं तूंच गोड गोड बोलून, विनवण्या करून, आर्जव करून मला भुलवलंस आणि शेवटीं माझा गळा कापून, माझी धुळधाण उडवलीस ! याचीं फळं तुलाहि मिळतील !

**दुष्टे तुला माज। चढला असे आज। उतरीन तव साज ॥ हा मी निजांगें ॥ मातापिता यांस। तुजसाठिं वनवास। दिधला बहु त्रास। स्मरसी न कां गे ॥ बोलून तुज गोड। पुरवीयलें कोड। त्याची अशी जोड। देशी भुजंगे ॥ नागीण तूं दुष्ट। कळलें मला स्पष्ट। ठेंचून करिं नष्ट। मिथ्या न सांगे ॥ समजावुनी तात। आणीन नगरांत। हाणोनि तुज लाथ। पळवीन ढोंगे ॥**

**चम०**—बरं बरं एकदां घराबाहेर व्हा, आणि मग रडायचं असेल तें सावकाश रडा.

**पुंड०**—शिव शिव !

**दुर्दैवाधीन झालों दीन मी मतिहीन साचा ॥**

**जखाई—रांडापोरें जमवुनि सारीं ॥**
**कालविली मातीं संसारीं ॥**

**पुंड०—बोलसि कां गे हृदयविदारीं ॥**
**भोग चुकेना तो निर्धारीं ॥**

**जखाई—द्रव्याचा धूर होता दूर लपली क्रुर वाचा ॥**

**पुंड०—दोषचि सारा हा नशिबाचा ॥**

**जखाई—केवळ अपुल्या मूर्खपणाचा ॥**

**पुंड—गेला झडुनी माज जयाचा ॥**
**कां करिसी अपमान तयाचा ॥**

**जखाई—झाला नादान नाहीं मान त्या अपमान कैचा ॥**

[एकमेकांवर जळफळत निघून जातात.

**चम०**—ठीक झालं. पाटीलसाहेब, आपल्या जोरावर या पुंडलिकाला घराबाहेर घालवून, त्याच्या सर्वस्वाची मालकीण तर झालें. आतां म्हटलं आपण यावं. [पट्टी देते.

**पाटील**—बरं आम्ही यायचं केव्हां ?

**काळ्या**—( स्वगत ) अवतणं धाडूं त्येव्हां ?

**चम०**—हें पहा, आपले किनई माझ्या शिरावर डोंगराएवढे—डोंगराएवढे कां ग बाई—मेरुपर्वताएवढे उपकार झाले आहेत. ते मी कध्धीं कध्धीं विसरणार नाहीं हो.

**पाटील**—यांत उपकार कसले ? माझं कर्तव्य मीं बजावलं.

**चम०**—तर मग हें तुमचं कर्तव्य मी ध्यानांत ठेवीन आणि आजपासून आपल्याशींहि असंच कर्तव्य बजावीन.

**पाटील**—असं म्हणजे कसं ? पुंडलिकाशीं केलंस तसं कीं काय ?

**चम०**—छेः छेः ! आपल्यासारख्या थोरामोठ्याशीं मला त्याच्यापेक्षांहि जपून वागलं पाहिजे.

**पाटील**—भले शावास ! ह्या एवढ्या मोठ्या कामगिरीबद्दल मला चमकाजी-कडून कांहीं निराळंच बक्षीस मिळालं पाहिजे.

**चम०**—नी मला आतां शहाणं झालं पाहिजे.

**पाटील**—कां बरं ?

**चम०**—कां बरं ? अहो तुम्हांला एवढी अक्कल नाही ?

**पाटील**—मला अक्कल नाहीं ? (टकल्यावर हात फिरवून) मग हें काय आहे ?

**चम०**—घोकडालाहि हातभर लांब असते, पण त्यांत अक्कल कांहींच नसते. अहो, तुम्हांला असं कळेना की, कसा झाला तरी तो पुंडलीक तुमच्या गांवचा, तुमच्या बरोबरीचा, पण त्याच्यावर उलटून पडायला तुम्हीं कमी केलं नाहीं; मग माझ्यासारख्या नायकिणीशीं काय मोठ्या इमानानें वागणार आहांत ?

**पाटील**—असं काय ? पण म्हटलं, मी गांवचा पाटील आहें. पाहून घेईन.

**चम०**—तर मग मीहि, तुम्ही पाटील काय किंमतीचे आहांत, तें चव्हाठ्यावर आणीन.

**पाटील**—अरे बापरे ! नको, तेवढं नको करूं माझे आई. मी आपला मुकाट्यानं जातों कसा. (रागानें मिशीला पीळ देत गुरगुरत जातो.) शिव शिव ! या अवदसेच्या मोहजाळांत सांपडून मी खरोखरीच शुद्ध मुर्ख बनलों. अथवा एका अर्थी बरोबरच आहे. आमच्यासारखे आंबटशोकी रंडीबाज शेवटीं असेच फसायचे. [ जातो.

**काळ्या**—दुर्गति, केलंस हें ठीक केलंस. पण आतां पुढं विचार ?

**चम०**—आपलं पूर्वी ठरल्याप्रमाणं पुंडलिकाच्या घरादाराचं वाटोळं तर केलंच; आतां चला दुसऱ्या ठिकाणीं.

**काळया**—ठीक. कुणाच्याहि घरांत प्रथम मी कली, संचार करून कलह लावून देतों—

**चम०**—म्हणजे त्या घराची राखरांगोळी करून, त्यांतील माणसांना दुर्गतीला पोंचविण्याचं काम माझं !

---

## प्रवेश दुसरा

( **काशीचा मार्ग**–पुंडलिक जखाईला खांद्यावर घेऊन येतो. )

**पुंड०**—अग, पण हें काय ? नीट बसायचं सोडून लाथा काय झाडतेस ? मी घोडाबिडा आहे कीं काय ?

**जखाई**—मला आपली ग्वाली उतरा कशी. ते ग्वांद्यावर बसणं नको नी तें रडगाणं पण नको. काय मेलं ! आजच्या सात्या दिवसांत फार तर सात आठ कोसच खांद्यावर बसलें असेन. कांहीं दहा वीस कोस तर नाहीं ? कामाला चुकार नी बोलायचं फार !

**पुंड०**—झालं, आला राग. पण पहा बरं, माझे ग्वांदे कीं नाहीं अगदीं भरून आले आहेत.

**जखाई**—हं ! एकदां तुम्हींच ना म्हणाला होतां कीं, तूं अगदीं गुलाबाच्या फुलाप्रमाणं आहेस म्हणून ? आणि आतां माझ्या भारानं खांदे भरून आले म्हणतां ?

**पुंड०**—भले ! शृंगारांत गमतीनं तसं म्हटलं, म्हणून व्यवहारांत तें खरं कां मानायचं ? बरं एवढे माझे ग्वांदे चेप पाहूं.

**जखाई**—हो तर ! काय बघा, माझेच पाय कुणी चेपील कीं काय, याचीच उलट मी वाट पहातें.

**पुंड०**—कां ? तुला काय झालं ? चांगली खांद्यावर बसून वरमायीप्रमाणं मिरवत तर आलीस ?

**जखाई**—अहाहा ! बाळसेदार घोडं पडलं कीं नाहीं, वरमायीप्रमाणं मिरवत यायला ? उलट खांद्याकोपरांचीं हाडं माझ्या मांडीला ठसा ठसा खुपत होतीं.

**पुंड०**—शाबास ! शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड ! आतां तुझ्या सुखाकरितां, मी आपलीं कोपरं तासून घेऊं होय ?

**जखाई**—तासायला कोण सांगतं आहे ? पण डोक्याचा रुमाल खांद्याकोपराला गुंडाळला असता तर ? पण म्हणे, डोक्याला ऊन्हच लागतं, थंडीच वाजते, वाराच झोंबतो; असा वितंडवाद करायची खोडच.

**पुंड०**—बरं बुवा, आम्हीच वितंडवादी, झालं ?

**जखाई**—नाहीं तर काय ? मेलं, मला खांद्यावर घेऊन गमतीनं हंसत खेळत चालायचं, पण त्याला सतरा पंचायती नी अटरा फांटे फोडले.

**पुंड०**—आतां मात्र कमाल झाली. तुझे पाय दुख्यूं लागले म्हणून लाज, अब्रू सोडून पायांतली वहाण डोक्यावर घेतली.

**जखाई**—म्हणजे ? मी पायांतली वहाण वाटतं !

**पुंड०**—तसं नव्हे ग. पण बायकोला डोक्यावर घेणं म्हणजे तसंच नव्हे का ?

**जखाई**—जीभ फार लांबली बरं ! माझ्या नाहीं हो कामी पडायचं ! यापुढं तो रुमाल तोंडाला बांधा कसा ?

**पुंड०**—म्हणजे ? हा माझ्या तोंडाला लगाम वाटतं !

**जखाई**—कांहीं समजा. पण कशानं तरी तोंड बांधाल, तरच मी पुन्हां खांद्यावर बसेन.

**पुंड०**—एकूण ही काशीयात्रा माझ्या खांद्यावर बसून का तूं करणार ?

**जखाई**—जरूर असेल तर.

**पुंड०**—खरं आहे. 'अडला हरी आणि गाढवीचे पाय धरी.'

**जखाई**—काय ? काय पुटपुटलांत ? मला नाहीं हो असलं पुटपुटणं आवडायचं. माझी दगदग सोसवत नव्हती, तर गांव सोडायला सांगितलं कुणी ?

**पुंड०**—नशिबानं ! ज्या ठिकाणीं अपमान झाला, त्या ठिकाणीं राहणं बरं नव्हे, म्हणून गांव सोडून निघालों; पण प्रवासांत तूं तरी आतां थोडं मला सौख्य दे.

**जखाई**—खरंच का ? कुणी म्हणेल, जसं कांहीं मीं यांना तलवारीच्या धारेवरच धरलं आहे. बरं, आतां बडबड करूं नका. या दगदगीनं मला झोंप येत आहे.

**पुंड०**—अग वेडे, रात्रीं अपरात्रीं रानावनांत असं अस्ताव्यस्त निजूं नये. विंचूकाटा, सापकिरडूं, भुतंखेतं, अशा हजारों भानगडी इथं असतात.

**जखाई**—असोत भानगडी. असेल काळजी तर बसा पहारा करीत. माझी झोंप मोडाल, तर सांगेन काय तें. [ निजते.

**पुंड०**—एकूण तूं झोंपणार आणि मी पहारा करणार ! खरोखरच बायकासारखा सुखी प्राणी या जगांत कुणी नसेल ! पुरुषांनीं बाहेर मरमर मरावं आणि यांनीं गजगौरीप्रमाणं नटून घरभर फिरावं ! श्रमामुळं झोपेनं तर माझ्यावर कहर केला आहे, पण निजेन तर ही म्हैस नाक फेंदारून उठायची. बसूनच डुलकी घ्यावी झालं. हरहर !—

**दैवा चक्रगती तुझी अवरोधाया समर्थ कुणि नाहीं ॥**
**होत्या मउशा उशा उशाला जरी दुशालाही ॥**
**माडी वाडी गाडि अघाडी धांवति जन पायीं ॥**
**गाडी ठिकाणीं माडी ठिकाणीं फिरतों वनिं पाहीं ॥**

[ पुंडलीक बसून डुलकी घेतो. गंगा, यमुना, सरस्वती, इत्यादि नद्या मलिन वेषानें प्रवेश करीतात.

**यमुना**—सरस्वती, चल कशी लौकर. पण सरस्वती, तूं एकदम अशी काळं ठिक्कर कशी पडलीस ?

**सरस्वती**—अहाहा ! मी काळी नि तूं काजळाची गोळी. अगबाई ! पण गंगे, तूं ग कां अशी विद्रूप दिसूं लागलीस ?

**गंगा**—मला वाटतं, कुणी तरी महापापी आसपास आला असावा.

**सर०**—होय ग होय. तो पहा मेला काळमुख्या पुंडलीक.

**पुंड०**—माझं कुणी नांव घेतलं ?–आं ? या कोण ? शाकिणी का डाकिणी ?

**गंगा**—मेल्या भद्रकपाळ्या, तुझी दृष्टीच अशी कीं, तिच्या योगानं सुरूपाचं कुरूप होईल.

**यमुना**—सोन्याची माती होईल.

**सर०**—हिऱ्यामाणकांचे कोळसे होतील.

**गंगा**—आकाश फाटेल.

**यमुना**—चंद्राला ग्रहण लागेल.

**सर०**—तारे गळून पडतील.

**गंगा**—अमृत नासेल.

**यमुना**—पृथ्वी दुभंगेल.

**सर०**—साधुसंतांना ताप होईल.

**गंगा**—सत्कर्म बंद पडतील.

**यमुना**—सद्धर्माचा लोप होईल.

**सर०**—त्रैलोक्याचा प्रलय होईल.

**गंगा**—तेव्हां तुझ्या पापी दृष्टीला आम्ही शाकिणी, डाकिणी दिसूं लागलों यांत नवल काय?

**पुंड०**—अरे बाप रे! अहो जनानी गोलंदाज, हा सर्व तोफखान्याचा भडिमार माझ्यावरच का चालला आहे?

**यमुना**—होय वरं कर्मचांडाळा. आपलं तोंड बुरखासारखं लपवायचं सोडून दुसऱ्याला अपशकून करायला, मेल्या, चाललास रे कुठं?

**पुंड०**—अरेच्या! पण मीं कुणाच्या बापाचं घोडं मारलं, म्हणून तुम्ही मला असे शिव्याशाप देतां? अं! मीं कुणाचा काय अपराध केला?

**गंगा**—पुन्हां गाढवासारखं लांब तोंड करून अपराध विचारतोस? अरे निलाजऱ्या, ज्यांनीं तुझं प्रेमानं लालनपालन केलं, त्या मातापितरांची अवज्ञा केलीस.

**यमुना**—त्यांच्याकडून करवूं नयेत तीं कामं करवलींस.

**सर०**—अवहेलना करून त्यांना पदोपदीं रडवलंस.

**गंगा**—त्यांना हांकलून देऊन रानावनांत फिरायला लावलंस.

**पुंड०**—हात्तीच्या! त्या थेरड्याथेरडीकरतांच का ही वटवट? मीं म्हटलं माझ्या हातनं तुमचं कांहीं नुकसान झालं!

**गंगा**—कोडगाच तूं ! तुझ्याशी काय बोलायचं ? जा, आल्या वाटेनें परत जा आणि मोरींतल्या बेडकाप्रमाणं तिथलीच घाण हुंगीत बैस जा.

**पुंड०**—देवा, काय रे हे माझ्यावर आरोप ! झांक रे बाबा आपले डोळे !

**यमुना**—अहाहा ! उभ्या आयुष्यांत आतांच तुझ्या अमंगळ तोंडांतून निघालेली हांक ऐकून, धांवत यायला देव खुळाच असेल ! कधीं देवावर पाणी घातलंस ?

**गंगा**—का कधीं गंधफूल वाहिलंस ?

**सर०**—का कधीं मनोभावानं शरण गेलास ?

**यमुना**—काय ? केलंस तरी काय ? नाहीं म्हणायला त्या चमकाजीची मात्र तिन्ही त्रिकाळ षोडशोपचारें पूजा करीत होतास.

**गंगा**—तिला केशराची उटी लावीत होतास.

**यमुना**—तिला सोन्यामोत्यांचीं फुलं वहात होतास.

**गंगा**—तिला पंचपक्वान्नांचा नैवद्य दाखवित होतास.

**सर०**—शेवटीं घरादाराचाहि नैवेद्य दाखवलास ! तेव्हां आतां तिलाच शरण जा.

**पुंड०**—पण इतक्या तंतोतंत खुणा पटवून शिव्या देणाऱ्या तुम्हीं आहांत तरी कोण भवान्या ?

**यमुना**—जळो ग मेल्याचं तोंड ! करंट्या, आम्हीं गंगा, यमुना, सरस्वती, अशा नद्या आहोंत नद्या.

**पुंड०**—काय नद्या ? तर मग कांहीं वेळानें तुम्हीं मला डोंगर म्हणाल. पण काय हो, नद्या तर प्रवाही असतात, मग तुम्हीं अशा कशा ? बर्फाच्या पुतळ्या म्हणाव्या तर चांगल्या बोलतां, चालतां, हंसतां, खिदळतां. हें काय गौडबंगाल ?

**गंगा**—अरे मूर्खा, आमचीं मूळ स्वरूपें हींच, पण जगाच्या कल्याणाकरितां आम्हीं तशा वाहतों.

**पुंड०**—तुमच्या तशा वाहाण्यानं जगाचं कल्याण काय होतं बुवा ?

**यमुना**—तुझ्यासारखे पापी लोक आपल्या स्नानानं आम्हांला पाप देऊन, आपण पुण्यवान् होतात आणि त्या पापामुळं आमची अशी अवस्था होते. नाहीं तर आम्ही देवांगनाप्रमाणं सुंदर आणि सतेज आहोंत बरं.

**पुंड०**—तर मग मी मुद्दां देवांप्रमाणें सुंदर आणि सतेजच आहे म्हणायचा. पण काय हो, मग हें विद्रूप टाकून पुन्हां तुम्हीं सुंदर कशा होतां ? सापाप्रमाणं कांत टाकतां कीं काय ?

**गंगा**—मेला निव्वळ पाषाण आहे. अरे, इथं जवळच महानुभाव कुक्कुट-स्वामी राहतात—

**पुंड०**—असतील. असे मुक्कटस्वामी गांवोगांव भाराभर आहेत. पुढं ?

**यमुना**—अरे उन्मत्ता, त्यांच्याच पवित्र दर्शनानं आम्ही पूर्ववत् होतों.

**पुंड०**—हें मोठेंच आश्चर्य बुवा ! बरं, ते मुस्कुटस्वामी तुम्हांला भस्माच्या राशीत लोळवतात. कीं कांहीं वनस्पतीचा रस अंगाला लावतात ?

**सर०**—अरे राक्षसा. त्या महासत्पुरुषाच्या निंदेनं आपली जीभ विटाळून नर्ककुंड अगदींच जवळ ओढं नकोस. हा सारा प्रभाव त्यांच्या मातृपितृभक्तीचा आहे बरं.

**पुंड०**—मातृपितृभक्ति ! हें काय आणखी नवीन खूळ आहे ? कमाल आहे बुवा या गोसावड्यांची. आयाबापड्यांना भुलवून, आपला मतलब कसा साधावा, हें तत्त्व त्यांच्याकडून शिकावं. पण काय, हो, गंगाभागीरथी–यमुनाबाई, तसंच म्हटलं–तुम्ही सरस्वतीअक्का, ही मातृपितृभक्ति कुठंसी विकत मिळते हो ?

**यमुना**—अरे अभाग्या, तुझं डोकं तर नाहीं फिरलं ? भक्तीचं दुकान मांडायला ते भोंदू नाहींत बरं.

**गंगा**—पूर्वपुण्याईनं अनायासं त्यांच्या आश्रमाजवळ आला आहेस, तर अहंकार सोडून अनन्य भावानं त्यांना शरण जा.

**सर०**—दीनासारखी याचना कर, म्हणजे तेच तुला मातृपितृभक्तीचा उपदेश करतील.

**पुंड०**—किंवा आपल्याप्रमाणंच दिगंबर अवधूत बनवतील !

**गंगा**—चला ग! या मेल्याशीं जास्त बोलून कशाला आपली जीभ विटाळतां?

**लव नक्ष जया मुळीं पापभीती ॥ प्रमत्त खळ हा सुखें रडो ॥ कर्म तयाचें तया नडो ॥ सदा रौरवा वास घडो ॥ अवयव ॥ जळून गळून हताश बनून वनीं पडो ॥ पूज्य असतां तात-माता प्राणघाता जो सजे ॥ मातृदेवी लाथळोनि स्त्रीस भावें जो भजे ॥ अशा खळा स्थळ मिळो न सुख पळ जिवास तळमळ सदा जडो ॥** [ जाताल

**पुंड०**—हें काय गौडबंगाल आहे बुवा? मला वाटतं, या स्त्रिया आसपास राहणाऱ्या असून, त्या गोसावड्याच्या नादीं लागल्या आहेत. मी जास्त चौकशी करूं नये, म्हणून त्यांनीं मला कांहीं तरी थाप मारून, चार शिव्या देऊन, इथून पळ काढला असावा. बरं म्हणावं, माझी विनाकारण खरडपट्टी काढणाऱ्या सटव्यांनो, तुमचा खेळखंडोबा मीच उघड करतों. अग ए, ऊठ ऊठ, तुला एक गम्मत दाखवितों गम्मत!

**जखाई**—चुलींत गेली ती गम्मत. खबरदार माझी झोंप मोडाल तर.

**पुंड०**—आतां काय करावं या झोंपाळू म्हशीला? अग गाढवी, इथं जवळच एक ढोंगी बुवा रहातो.

**जखाई**—मरूं द्या मेला तो. तुम्हांला त्याच्याशीं काय करावयाचं आहे?

**पुंड०**—अग, त्याची फजिती करून, त्याचं ढोंग कसं बाहेर काढतों तें पहा तर खरं.

**जखाई**—तुम्हींच पहा तें. सोन्यासारखी झोंप मोडून मी नाहीं येत.

**पुंड०**—बरं, राह्यलं. पण ह्या अडचणींतून त्या ठिकाणी येऊन तर नीज. तोंपर्यंत मी जाऊन येतों. चल ऊठ.

[ जखाईला ओढीत नेतो.

---

## प्रवेश तिसरा

[ **कुक्कुटस्वामींचा आश्रम**–कुक्कुटस्वामी आपल्या आईबापांची सेवा करीत असतां गंगादि नद्या त्यांच्या सेवेला येतात.

**नद्या—**

**हरण करुं या । मलिनता । मुनिवरगुणगण ते गाउं या ॥**
**अंगणिं या, सारवुं या । गृहिं सुविमल जल तें आणुं या ॥**
**आश्रम हा, शोभवुं या । नवविकसित कुसुमें थाटुं या ॥**
**मुनिराया, निरखुनियां । खलकृत अघ विलया नेउं या ॥**

**कुक्कुट**—सच्चिदानंद ! सच्चिदानंद ! ! मातृपितृदेवार्पणमस्तु !

[ कुक्कुटस्वामीच्या दर्शनानें नद्या दिव्यदेही होतात.

**नद्या—जय जय जय मुनिराज ॥ मंगल गुणधामा ॥ पंचारति ही करितों नतजनविश्रामा ॥ निष्कामत्वें करितां पितरांची सेवा ॥ झालां तुम्हि प्रिय सकलां नरमुनिजनदेवा ॥ साधु-शिरोमणि ऐसें नाम तुम्हां साजे ॥ दिव्य यशोदुंदुभि तव भुवनत्रयिं गाजे ॥ गंगायमुनादिक अम्हि सरिता मलिनांगा ॥ दर्शनमात्रें करितां आमुच्या अघभंगा ॥ जगदोद्धारक तारक अगम्य तव महिमा ॥ रात्रंदिन वर्णाया सन्मति द्या आम्हां ॥ सेवा नित्य घडो हा प्रसाद द्या बरवा ॥ निजकर्मी रत व्हाया निरोप तुम्हि द्यावा ॥**

**कुक्कुट**—मातुश्री, माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्याकरितां कशाला हे कष्ट घेतां ?

**गंगादि**—लोकांनीं आम्हांला दिलेलीं पापं आपल्यासारख्या साधुसंतांच्या दर्शनानं नाहींशीं होतात म्हणून. बरं, येतों आतां. [ जातात

**पुंड०**—( प्रवेश करून ) नमस्कार साधुमहाराज ! कसं काय ? चांगली चंगळ चालली आहे ना तुमची !

**कुक्कुट**—( स्वगत ) अरे ! हा तर पुंडलीक ! कलि, दुर्गति इत्यादिकांच्या तडाक्यांतून स्वारी लवकरच सुटली म्हणायची. परंतु प्रकृति अद्याप ताळ्यावर

आलेली दिसत नाहीं. (उघड) बाळा पुंडलिका, केव्हां आलास रे तूं? ये रे बाबा, मला आधीं प्रेमालिंगन दे.

**पुंड०**—(स्वगत) आलिंगन दे? अरे, हा गोसावडा तर आलिंगनाला सोकावलेला दिसतो? तेव्हांच त्या बायका याच्याकडे आल्या होत्या बरं का! (उघड) अहो बगळेबुवा, नीट डोळे उघडून पहा. म्हटलं मी तुमच्यासारखा पुरुष आहे पुरुष. फक्त तुम्ही ढोंगी आणि मी असा साधा भोळा, इतकाच काय तो फरक.

**कुक्कुट**—होय, तें मलाहि ठाऊक आहे. पण बाळा, तूं एकटा चाललास कुणीकडं?

**पुंड०**—मी काशीला जातों आहें. इथून किती दूर आहे काशी?

**कुक्कुट**—आपण कल्पना करावी तशी?

**पुंड०**—(स्वगत) अरेच्या! हा पक्का बिलंदर दिसतो. बेटा सरळहि बोलत नाहीं. (उघड) अहो भरकटस्वामी, असें पागल माणसाप्रमाणं भकतां काय? मीं कल्पना केली, तर इथं येईल का काशी?

**कुक्कुट**—इथंच काय? पण लोहदंडक्षेत्रांत कल्पना केली असतीस, तर तिथंच होती तुझी काशी!

**पुंड०**—अरे वा रे बोकेसंन्याशी! तुमच्या बापदादांनीं कधीं काशियात्रेचं नांव तरी ऐकलं होतं का?

**कुक्कुट**—नांवच काय,–पण घडोघडी माझी काशीयात्राच होत असते?

**पुंड०**—हो, भांगेच्या तारेंत होत असेल काशीयात्रा! गांजाच्या लहरींत मीसुद्धां कधीं कधीं स्वर्गाला जात असतों. अहो भंगड, जरा शुद्धींत बोला, शुद्धींत बोला. सकाळच्या रामप्रहरींसुद्धां भांग झोंकलीत कीं काय? साधुवेषानं दुसऱ्यांच्या बायकांना नादी लावतां, पण या बहाद्दरांपुढं तें ढोंग चालणार नाहीं बरं?

**कुक्कुट**—शिव शिव! काय बोलतोस हें? आपल्या निर्मळ आणि पवित्र जलानं, सर्व जगाला पावन करणाऱ्या, त्या परमपूज्य गंगादि नद्या होत्या.

**पुंड०**—भले गप्पीदास! त्या नद्या? आणि तुम्हांला भेटायला आल्या? तेव्हां तुम्ही समुद्र, होय ना? अहो समुद्रपंत, हा समुद्र–नद्यांचा चोरटा संगम

कोणत्या शास्त्रांत सांगितला आहे ? आणि नद्यांनीं तुम्हांला भेटायला यावं, असे तुम्ही कोण ? भगीरथाचे वडील का आजोबा ?

**कुक्कुट**—त्या राजश्रेष्ठाची योग्यता मला कशाला हवी ? मातृपितृसेवेंत कालक्षेप करणारा मी एक हीन दीन मनुष्य आहें.

**पुंड०**—हो बरी आठवण झाली. काय हो चिरगुट स्वामी, हे मातृपितृसेवेचं बंड तुम्हीं काय माजवलं आहे !

**कुक्कुट**—बाबारे, तें बंड नव्हे; तर यमदंड चुकावयाचा तो राजमार्ग आहे ! सेवेमुळं संतुष्ट झालेले आईबाप, ज्या वेळीं मुलाला पोटाशीं धरतात, त्या वेळच्या आनंदाला उपमा नाहीं. आईबापांच्या छायेखाली जगांतल्या सर्व सौख्याचा लाभ होतो. त्यांच्या स्पर्शांत, वाणींत, दृष्टींत सर्वत्र अमृत भरलेलं असतं. बाहेर अपमान झाला असेल तर आप्तबांधव टोंचून बोलतील, पण आईबाप मधुर वाणीनं समाधान करतील. मूर्ख मुलाबद्दल इष्टमित्र निंदा करतील, पण आईबाप कौतुक करतील. निर्धनतेमुळं, स्त्री हृदयावर डागण्या देईल, पण आईबाप प्रेमानं पोटाशीं धरतील. दुर्लौकिकांत स्वतःचीं मुलं अवहेलना करतील, पण आईबाप प्रेमाश्रु ढाळतील. हातून भयंकर पाप घडलं, तर सर्व लोक धिक्कार करतील, पण आईबाप देवाची प्रार्थना करतील. फार काय, स्त्री-पुत्र सुखाचे वांटेकरी होतील, पण आईबाप दुःखाचे वांटेकरी होऊन, प्रसंगीं मुलांकरतां प्राणहि देतील. सारांश, आईबापांच्या ममतेला सीमा नाहीं, त्यांच्या प्रेमाला उपमा नाहीं, दयाळुपणाला जोड नाहीं, आशीर्वादासारखं यश नाहीं आणि त्यांच्या उपकारासारखा भार नाहीं; हें लक्षांत ठेवून वागणार नाहीं, त्या चांडाळाला निश्चयेकरून अधोगतिच प्राप्त होणार !

**पुंड०**—अरे बाप रे ! पण त्या अधोगतीपेक्षां, या तुमच्या तोफखान्याचीच मला जास्त भीति वाटते. बरं पण काय हो, या तुमच्या बडबडपुराणांत आई-बापांची सेवा करणाऱ्यांना कांहीं बक्षिसहि सांपडेलच.

**कुक्कुट**—अलबत. पुंडलिका, आईबापांना जर नुस्ता एक वेळ नमस्कार केला, तर प्रत्यक्ष काशीयात्रेच पुण्य लागतं. तीन वेळां नमस्कार केला, तर कोटि यागांचं पुण्य घडतं. आणि एक दिवस मनोभावानं सेवा केली, तर तीन वेळां पृथ्वीप्रदक्षिणा केल्याचं पुण्य मिळतं. बाबा रे, या जगांत अन्नदानासारखं

दान नाहीं, द्वादशीसारखी तिथि नाहीं, एकादशीसारखं व्रत नाहीं, गायत्री-मंत्रासारखा मंत्र नाहीं, आणि मातेसारखं दैवत नाहीं. म्हणून ज्यांना सोपा पुण्यमार्ग जोडावयाचा असेल त्यांनीं एकनिष्ठपणें आईबापांची सेवा करावी. त्यायोगें ते धन्य होतील. अशाच पुत्रांनीं आपल्या जन्माचं सार्थक केलं; नाहींपेक्षां भूमीला भार होऊन दुर्गतीची जोड करायला आणि आपला पवित्र वंश बुडवायलाच असले चांडाळ कारणीभूत होतील, यांत तिळमात्र शंका नाहीं.

**पुंडलीक**—पण काय हो, हें आईबापांच्या भक्तीचं खूळ पहिल्यानं तुमच्याच डोक्यांत शिरलं, कीं असे वेडेपीर पूर्वी होऊन गेले आहेत ?

**कुक्कुट**—अशा सत्पुरुषांना तूं वेडेपीर ठरवलंस, पण त्याच वेडेपीरांनीं सर्व जगाला वेड लावलं आहे. प्रभु रामचंद्रानं आईबापाचं वचन सत्य करण्याकरितां, अयोध्येचं राज्य सोडून दंडकारण्यांत राहणं स्वीकारलं. इच्छामरणी भीष्माचार्यांनीं, पित्राज्ञेकरितांच आजन्म ब्रह्मचर्यव्रत पाळून राज्यत्याग केला. वीर सुधन्व्यानं आईबापांच्या भक्तिबलावरच श्रीकृष्णाला हतवीर्य केलं. भार्गवरामानं पित्राज्ञा मानून आईचा वध केला, पण पितृकृपेनंच पुन्हां आईला जिवंत केलें. केवळ आईची आज्ञा, म्हणून पांचहि पांडवांनीं द्रौपदीशीं लग्न केलं आणि आईच्या आशीर्वादावरच ते यशस्वी झाले. पाण्याकरितां आईबाप तळमळतील, म्हणूनच श्रावणानं दशरथाला शाप दिला नाहीं. तेव्हां आतां तूंच सांग कीं, अशा महात्म्यांच्या चरितामृताकरितां कोण वेडे होणार नाहींत ?

**पुंड०**—तुमच्यासारखे मूर्ख असतील ते वेडे होतील. अशा वायफळ गप्पांनीं फसणारा मी नाहीं, समजलांत ? काय माझं व्हायचं असेल, तें होऊं द्या.

**कुक्कुट**—काय झालं, याचा तुला अनुभव आलाच आहे. आईबापांची भक्ति सोडलीस, म्हणूनच तुझी स्त्री शिरजोर झाली. न्याय, नीति, धर्म, यांना पायाखालीं तुडवलंस, म्हणूनच चमकाजी, काळ्यासारख्यांनीं तुझ्या घरांत शिरून तुला देशोधडीस लावलं. इष्टमित्रांत वैर जोडलंस, म्हणूनच पाटलानं उलटा न्याय दिला आणि त्यामुळंच तुला या यातना भोगाव्या लागत आहेत. बाबा रे, या जिवंतपणांतील यातना झाल्या, पण मेल्यावर आणखी भयंकर यमयातना पुढं आहेतच.

**पुंड०**—अरे चल. ढोंगी गोसावड्या, मेल्यावर आम्ही यमयातना भोगूं तेव्हां भोगूं, पण तुझ्या पाठींत लाथा मारून जिवंतपणीं मींच तुला त्या भोगायला

लावतों, नि तुझं ढोंग बाहेर काढतों. जरा ताठ उभा रहा. ( लाथा मारायला जातो, तोंच ) बाप रे, हा भयंकर साप इकडे कुठं ? अरे ! या बाजूला तर खवळलेला वाघ दिसतो आहे, आणि इकडे तर भुतं दिसताहेत ! जणुं यमयातनेचाच देखावा ! अरे देवा ! माझ्या चोहों बाजूला या अग्नीच्या ज्वाळा कसल्या ? आय आई ! भाजलों, मेलों ! साधुमहाराज, धांवा धांवा, मला वांचवा ! मला वांचवा !

**कुक्कुट**—घाबरूं नको. आईबापांचा छळ करणारांची पुढं काय अवस्था होते, याचा हा देखावा आहे. अजून सावध हो आणि ही दुर्गति चुकव.

**पुंड०**—तर मग अशा यातनांतून सुटायला मीं काय करावं ?

**कुक्कुट**—सेवाचाकरीनं आईबापांना संतुष्ट करावं !

**पुंड०**—ठीक आहे. मी तें आजपासून करीन. गुरुराज, मला क्षमा करा मी तुमचे पाय धरतों. मला सन्मार्गाला लावा. मी महापापी, अधम, चांडाळ, नीच, केवळ नरपशु आहें. मी आजपर्यंत अत्यंत अनन्वित कर्मे केलीं ! ज्यांचे उपकार जन्मजन्मांतरीं फिटणार नाहींत, ज्यांच्या योग्यतेपुढं कुणीहि टिकणार नाहीं, अशा प्रेमळ आईबापांचा मीं कुलांगाकारानं छळ केला. धिक्कार, धिक्कार असो मला !

**कुक्कुट**—ऊठ, ऊठ. पश्चात्तापानं मनुष्य शुद्ध होतो, असं शास्त्रवचन आहे, पण यापुढं मात्र आपलं वर्तन बदल. आधीं आईबापांचा शोध करून त्यांची जिवाभावानं सेवा कर. म्हणजे तूं त्रिभुवनांत धन्य होऊन सर्वत्र वंद्य होशील.

**पुंड०**—हें मनोराज्य खरं कसं होईल

**कुक्कुट**—बाबा, तुझ्या सद्वर्तनानं !

**पुंड०**—पण पूर्वीच्या दुर्वर्तनावर उभारलेले पातकांचे डोंगर नाहींसे होतील तेव्हां ना ?

**कुक्कुट**—अरे, तुझ्या आईबापांची भक्तिरूप शक्ति त्यांवर पडून तुझ्या पातकांचा संहार होईल. या आईबापांच्या सेवेवर तुला हवं तें करतां येईल.

**पुंड०**—काय ? मला सद्गति मिळेल ?

**कुक्कुट**—तुला सद्गति द्यायला परमेश्वरहि धांवून येईल.

**पुंड०**:—छेः ! या पाप्याला पाहून तो परमात्मा दूर पळेल.

**कुक्कुटः**—नाहीं रे, उलट प्रेमानं कळवळेल. पुंडलिका, मी तुला निराळ्याच योग्यतेंत पहातों.

**पुंड०ः**—पण मला जिकडे तिकडे अंधारच दिसतो.

**कुक्कुटः**—याचं कारण, तुझं अज्ञान. दैदीप्यमान ज्ञानसूर्य तुझ्या हृदयाकाशांत उगवूं दे, म्हणजे तुला सर्वत्र ब्रह्मतेजच दिसेल. या आईबापांच्या सेवेवर तुला श्रीगंगेप्रमाणं पूज्य अशी भीमरथी नदीहि जवळ आणतां येईल.

**पुंड०ः**—पण कदाचित् ती या चांडाळाला पाहून गुप्त होईल.

**कुक्कुटः**—नाहीं. तुझं पातक धुऊन नेईल. तुझी निर्मल शक्ति पाहून भगवान् द्वारकाधीश श्रीकृष्ण, आपला आठवा अवतार संपवून, विश्रांतीकरितां 'श्रीविठ्ठल' नांवानं अवतार घेऊन तुझ्याजवळ रहातील.

**पुंड०ः**—इतकी कुठं या अभाग्याची योग्यता आहे ?

**कुक्कुटः**—असं कां म्हणतोस ? बाबा रे, सर्व प्राणिमात्रांचा उद्धार तुझ्याच नामस्मरणापासून होणार आहे. श्रीरामचंद्राकडून अहिल्येचा उद्धार करायला जसे विश्वामित्र कारण झाले, त्याचप्रमाणं दिंडिरवनामध्यें वृत्रशापाच्या योगानें वीट होऊन पडलेल्या इंद्राच्या उद्धाराला तूं कारण होणार आहेस. असा तूं मोठा भाग्यवान्, महापुण्यवान, भगवंताचा प्रियसखा, मुमुक्षजनांचा उद्धारकर्ता आणि पातकी जनांवर उपकारकर्ता आहेस. मी स्वतः सुद्धां तुझ्या चरणांवर सहस्र वेळां आपलं मस्तक अर्पण करावं, अशाच योग्यतेला तूं पात्र आहेस.

**पुंड०**—गुरुराज, कसली या कर्मचांडाळाची योग्यता ? हे सर्व कल्पनासृष्टीचे खेळ आहेत !

**कुक्कुट**—नाहीं रे ! तुझ्या मातृपितृभक्तीमुळं या भरतखंडांत अशीच घडामोड होणार आहे. तुझ्या लोहदंड क्षेत्राशेजारील दिंडिरवनाचा रुक्ष प्रदेश पवित्र अशा भीमरथीच्या उदकानं पावन होईल. ज्या ठिकाणीं गगनचुंबित वृक्ष आहेत, तेथें ध्वजापतका फडकूं लागतील. ज्या ठिकाणीं भयंकर हिंस्र पशूंच्या किंकाळ्या ऐकूं येत आहेत, तेथें साधुसंतांच्या तोंडचे भगवंताचे गुणानुवाद ऐकूं येतील. टाळमृदंगांच्या मधुर ध्वनीनं आकाश कोंदेल. जिथं गिधाडादि पक्षी भक्ष मिळवण्याकरतां आकाशांत तळपत आहेत, तिथं देव–भक्तांचा सोहळा

पहायला सुरमुनिकिन्नर विमानांत बसून फिरतील. फार काय सांगूं? पुंडलिका, तुझ्या मातृपितृभक्तीला वश होऊन, तो परब्रह्म परमेश्वर अठ्ठावीस युगांपर्यंत कटीवर हात ठेवून, प्रिय भक्तांची वाट पहात विटेवर उभा राहील.

**पुंड०**—महाराज, या गोष्टी आतां कशा होणार? आईबापांची भक्ति म्हणजे काय आणि ती कशी करावी हेंच मला कळत नाहीं.

**कुक्कुट**—तर मग आश्रमांत चल आणि मी आपल्या मातापित्यांची सेवा कशी करतों, ती पहा आणि कांहीं ऐक, म्हणजे तुला चांगला बोध होईल.

**पुंडलीक**—

**लीन पदिं मतिहीन हा अति दीन स्वजनावीण याची येऊंद्या सुदया॥ पुण्यपातक मज कळेना। आंवरीं परि मन वळेना॥ तव करुणा-कर मम शिरिं या ठेवीं श्रीसद्गुरुराया॥**

**कुक्कुट**—

**गेला झडोनी मल पातकाचा॥ झालासि तूं या मनिं शुद्ध साचा॥ बाधूं शकेना कलि तो विषारी॥ आतां सुखी हो त्यज भीति सारी॥**

**पुंडलीक**—

**अंग माझें कंप पावे॥ त्यांतुनी हें कांहिं धावें॥ क्षण उभेंही राहवेना॥ हाय पडतों करिं धरावें॥ शरणागत अघभयहरणा॥ परि तरणा करुणानिलया॥**

## प्रवेश चौथा

### काशीचा मार्ग

**जन्हु० व सत्य०**—

**भवकांतारीं। नागविले जन भारी॥ षड्रिपुपाशीं फसताती अविचारी॥ प्रबल सहा वैरी। हरिति मोक्ष चारी॥ विकट पंथीं। टाकिताती। अंतिं होती। अहितकारी॥ गृहधनसुत अंतीं। कुणि न कामिं येति॥ उलट जोरें।**

**स्वकृतभारें, नडाति सारे। होती वैरी ॥ तो शिव मदनारी। एकचि सहकारी। भ्रांति पळवी ॥ चित्त वळवी। सुपथ कळवी। अंतिं तारी ॥**

**पुंड०**—[ प्रवेश करून ]

**तात माउली भली ॥ पाहुं कोणत्या स्थलीं ॥ बाळपणीं कनवाळुपणें मज पालुनियां नच घालीं ॥ प्रेमबळें मम लळे पुरविता मुळिं न थकलिं कधिं कालीं ॥ परि केवळ मी काळ भयंकर बनुनि छळुनि वनिं लाविलीं तरि ॥ न कोपतां शांतपणें मज आशीर्वच वदलीं ॥**

**जखाई**—( प्रवेश करून ) बाई बाई ! कोण मेली ही घोडदौड ! ऐकलं का ? माझ्यानं कांहीं आतां चालवत नाहीं.

**पुंड०**—चालवत नाहीं ? तर बैस, नीज, नाहीं तर उभी रहा, मला काय सांगतेस ?

**जखाई**—असं सांगतें, कीं अशी धांवपळ करायची असेल, तर मला पुन्हां खांद्यावर घेऊन धांवा.

**पुंड०**—बाईसाहेब, तें विसरा आतां. तो पूर्वीचा स्त्रीलंपट पुंडलीक हा नव्हे. आजपासून हें सर्व शरीर केवळ माझ्या परमपूज्य आईबापांच्या सेवेंत झिजणार.

**जखाई**—म्हणजे ? आतां मला सोडून त्या म्हाताऱ्यांची का पूजा करणार ? पण सांगून ठेवतें, असलं खूळ मी नाहीं चालू देणार.

**पुंड०**—बरें आहे, तेंहि पाहूं.

**जखाई**—मीहि पाहीन.

**पुंड०**—हें पहा, आतां या तुझ्या तुणतुण्याला गवसणी घाल. तें माझ्या कानाला फार कठोर लागतं.

**जखाई**—कठोर लागतं, तर कानांत दट्टे बसवा.

**पुंड०**—अग, पण माझ्या कानांत दट्टे बसविण्यापेक्षां तुझी गर्जनाच कमी केलीस तर ? पण जाऊं दे. तुझ्या तोंडाला तोंड द्यावं कुणी ? भगवंता, माझ्या

जन्मदात्या आईबापांची लवकर भेट करीव आणि या इडळीच्या तावडींतून सोडीव. गुरुराज कुक्कुटस्वामी, साक्षात् श्रावणाचेच अवतार तुम्ही. मला दिव्य-दृष्टि दिल्याबद्दल मी आपल्याला शतशः प्रणाम करतों.

**जखाई**—आणि मी त्या मेल्याला लखोलीं वाहतें!

**पुंड०**—अग राक्षसिणी, असं बोलूं नकोस. साधुसंतांची निंदा केली, म्हणजे तोंडाला किडे पडतात. चल आतां. अहाहा! ही पहा शिवशक्तिस्वरूप अशीं माझीं मातापितरं! आई, बाबा, हा अधमाधम चांडाळ पुंडलीक तुम्हांला शरण आहे, मला क्षमा करा, क्षमा करा. [ धांवत जाऊन आईबापांचे पाय धरतो.

**जखाई**—उचलून कडेवर घ्या. कुक्कुलं बाळच कीं नाहीं.

**सत्य०**—कोण? कोण? माझा बाळ पुंडलिक का? बाळा पुंडलिका, येरे माझ्या लाडक्या, मला कडकडून भेट. आम्हाला भेटायला, तूं फारच तातडीनं आलास, तेव्हां दमला असशील रे बाळ. बैस बरं. मी तुझे पाय चेपतें.

**पुंड०**—छेः छेः आई, तुझ्याकडून सेवा घ्यायला हा महापातकी, पूर्वीचा पुंडलिक नव्हे. आजपर्यंत तुमच्या सेवेला विन्मुख होऊन, असंख्य पातकांचे डोंगर शिरावर घेतले, पण यापुढं तूं या पुंडलिकाची कुलस्वामिनी! हृदयाची आराध्यदेवता! आजपासून मी तुमचीच सेवा करणार. बाबा, कृतापराधांची या अधमाला क्षमा करा, क्षमा करा.

**जन्हु०**—बाळा ऊठ ऊठ. रडूं नकोस. पूर्वजन्मींच्या आमच्या पातकामुळें तुला तशी बुद्धि झाली, पण आतां अशी बुद्धि झाली; फार चांगलं झालं. देव पावला. तो काशीविश्वेश्वर तुला सुखांत ठेवो. दाशरथी श्रीरामचंद्र तुला चिरायु करो.

**सत्य०**—भागीरथी गंगामाता तुला पावन करो आणि अशीच सद्बुद्धि जन्मभर देवो.

**जखाई**—( स्वगत ) आणि या थेरडीला लवकर मरण येवो.

**पुंड०**—अहाहा! गुरुमहाराज, आईबापासारखं दुसरं दैवत नाहीं; हा तुमचा उपदेश किती तरी यथार्थ आहे! आजपर्यंत मीं ज्यांचा पदोपदीं छळ करून, अन्नवस्त्र न देतां घरांतून हांकून लावलं, तेच माझे आईबाप पुत्रवात्सल्यानं वेडे होऊन, मला आशीर्वाद देतात—पोटाशीं धरतात—माझ्यावर प्रेमाश्रू

ढाळतात ! तेव्हां त्यांची योग्यता काय वर्णावी ? धन्य धन्य ! ज्याच्या शिरावर आईबाप आहेत, ते मोठे धन्य आणि आईबाप जिवंत असून, त्यांचा छळ करणारे माझ्यासारखे दुष्ट पुत्र अधमाधम, चांडाळ, पापी, केवळ नरपशु होत. यमराज अशांचे हाल करो.

**जखाई**—( स्वागत ) आणि असल्या खुळयांना मात्र डोक्यावर घेऊन नाचो !

**जन्हु०**—पण बाळा, तुला हें ज्ञानामृत पाजलं तरी कोणी ?

**पुंड०**—बाबा, इकडे येतां येतां मध्यंतरीं गुरुवर्य कुक्कुटस्वामी यांचा आश्रम लागला. त्यांच्या बोधामृतानं माझ्या अंगांतील कलिमल गेला. मन निर्मळ होऊन, आत्मा पवित्र झाला. आतां या पुंडलिकाला तुमच्या सेवेवांचून कांहीं नको.

**जखाई**—( स्वगत ) म्हणजे ? मी सुद्धां नको कीं काय ? अरे मेल्या कुक्कुट्या, माझ्या नवऱ्याला हेंच का शिकवलंस ? मला जर हें आधींच कळतं, तर मेल्या लंगोट्या, तुझी दाढीच उपटली असती.

**सत्य०**—अरे, पण ती मुलगी कां तिकडे उभी ? इकडे ये बाळ. या आनंदाच्या भरांत तुझ्याकडे आमचं लक्षयच गेलं नाहीं.

**जखाई**—नाहींच जायचं. आपला तो बाब्या आणि लोकांची ती कार्टी.

**सत्य०**—उन्हातान्हांतून चालल्यानं, काय ग बाई माझ्या बयेची दशा झाली ही ! पोर अगदीं कोमेजून गेली बरं.

**जन्हु०**—अग, पश्चात्तापानंहि कदाचित तिला लाज वाटते असेल. तिला जवळ घे, जवळ घे.

**जखाई**—कांहीं नको. जवळ घेतल्यानं माझ्या अंगाचे कांटे बोंचतील. तिकडेच चालला आहे तितका चोमडेपणा पुष्कळ झाला.

**पुंड०**—ती तुफान घोडी अझून ताळयावर येत नाहीं. आई, बाबा, राहूं द्या तिला तशीच. जित्याची खोड मेल्यावांचून जाणार नाहीं. चिखलांत दगड टाकून, अंग माखून घ्यायला तुमचं काय नडलं आहे ?

**जखाई**—आणि माझं तरी कुठं खेटर अडलं आहे ?

**पुंड०**—चला आतां घरीं. आजपासून तुमची सेवाचाकरी मी एकटाच करीन आणि ब्राह्मणांना योग्य अशी माधुकरी मागून, पहिल्यानं तुम्हांला जेवायला घालून उरलेलें अन्न प्रसाद म्हणून मी खाईन.

**जन्हु०**—देव तुझं कल्याण करो! पण मला वाटतं, जवळ आल्यासारखं काशीयात्रा करून जावं; कसं ग?

**सत्य०**—खरंच बाळ. गंगामाईचं स्नान होऊन, विश्वेश्वराचं दर्शनहि घडेल.

**पुंड०**—आई, तूंच माझी गंगा. तुझं दर्शन हेंच माझं गंगादर्शन. तुझं वात्सल्य, हेंच गंगास्नान. तुझं पूजन, हेंच गंगापूजन. तुझं चरणतीर्थ, हेंच गंगासेवन. तसेच हे माझे परमपूज्य बाबा, म्हणजे प्रत्यक्ष काशीविश्वेश्वर. तात्पर्य तुम्हींच माझे देव, तुम्हींच माझीं तीर्थे. माझं सर्वस्व काय तें तुम्हीं. म्हणून म्हणतों आई, बाबा, मला काय ती आज्ञा असावी.

**जन्हु०**—बाळा, या तुझ्या भाषणानं मला किती आनंद होत आहे म्हणून सांगूं? पण मुलांना दैवत आईबाप, बायकांना दैवत पति, त्याचप्रमाणं आईबाप नसणाऱ्या आम्हां वृद्धांना सर्व जगाचा मायबाप जो परमेश्वर, तोच सर्वस्व. म्हणून म्हणतों एकदां काशीयात्रा करून घ्यावी.

**पुंड०**—जशी तुमची आज्ञा. चला तर, मी तुम्हांला उचलून खांद्यावर घेतों.

**जखाई**—हं! पूर्वी मी एकटी जड झालें होतें आणि आतां हीं दोन गाढवं बरी उचलतील? बरोबरच आहे. आवडीचं घोडं नि वजनाला थोडं.

**पुंड०**—हं. बाबा, आई, बसा माझ्या खांद्यावर आणि माझा पापी देह पवित्र करा. तुमच्या छळानं काळं झालेलं हें तोंड मला उजळ करूं द्या. या हतभाग्यानं तुम्हांला जितकं दुःख दिलं आहे, त्याच्या सहस्रपट सेवा घ्या; तेव्हांच तुमच्या उदरीं जन्म घेतल्याचं सार्थक! नाहीं तर माझ्यासारखे दोन पायांचे पशु, जन्माला आले काय आणि मेले काय, सारखेच!

**देई रे हरि॥ हेंचि मला दे॥ मायपिताजी॥**
**मायबाप यांची सेवा॥ नित्य घडो या करीं॥**

**जन्हु०—जन्मोजन्मीं सुपुत्र हाचि॥ लाभो आम्हां यापरी॥**
**गंगाकाशीनिवास बरवा॥ साधू-संत-चाकरी॥**

**सर्व—आणि काय मागूं देवा॥ राहि आम्हां अंतरीं॥**

---

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला

[ पुंडलीक आईबापांची पूजा करीत आहे. ]

**जन्हु०**—आतां तुझ्या नित्य नियमांपैकीं काय राहिलं आहे ?

**पुंड०**—बहुतेक झालंच. आतां आरति करून घेतों. मग तुम्हीं सावकाश पोथी वाचायला बसा आणि आई तुळशीच्या पूजेला बसेल. ( जन्हु व सत्यवती जातात. तीर्थ हातांत घेऊन ) अहाहा ! हें माझ्या परमपूज्य आईबापांचं चरणतीर्थ. याचा महिमा काय वर्णन करावा ? धन्य धन्य माझं भाग्य !

**जखाई**—( येऊन तीर्थ उडविते. ) चुलींत गेलं तें भाग्य. दिवसेंदिवस हा खुळेपणा वाढणार तरी किती ? मेलं जों जों पहावं, तों तों अधिकच. थेरडाथेरडी मेल्यावर त्यांना वाळवून का ठेवणार आहांत तीर्थ घ्यायला ?

**पुंड०**—चांडाळणी, माझ्या आईबापांचं चरणतीर्थ फुकट घालवलंस ना ?

**जखाई**—तीर्थ सांडलं म्हणून फारच वाईट वाटत असेल, तर त्यांना विहिरींत नेऊन बुडवा. म्हणजे सगळ्या गांवाला पुरून उरेल इतकं तीर्थ तयार होईल. मग घ्या—तीर्थच तीर्थ, तीर्थच तीर्थ. प्या—हवं तितकं प्या.

**पुंड०**—अग अभागिनी, त्यांतलं थोडसं तरी तीर्थ मला द्या, म्हणून भांडायचं सोडलंस आणि हें काय भलतंच केलंस ?

**जखाई**—माझा पायपोस अडला आहे, त्या पांढऱ्या पायांचं तीर्थ घ्यायला.

**पुंड०**—बरोबरच आहे. गाढवानं उकिरडा फुंकावा, त्याला साखरेची चव काय ?

**जखाई**—मला साखरेची चव माहीत आहे. त्या घाणेरड्या तीर्थाची चव तुमची तुम्हीच घ्या.

**पुंड०**—अग राक्षसिणी, विष्णूचं चरणतीर्थ जी गंगा, ती प्रत्यक्ष शंकरानं सुद्धां शिरावर घेतली, मग मी माझ्या आईबापांच्या चरणतीर्थाची योग्यता अधिक समजतों, यांत नवल काय ?

**जखाई**—पुरें पुरें. त्या खतावण्याची थोरवी नको गायला. मेले शेणामातीनं बरबटलेले पाय आणि त्यांचं तीर्थ म्हणे असें नि तसें आहे. शर्त झाली बाई या वेडेपणाची!

**पुंड०**—खरं आहे. माकडाला रत्नांची योग्यता काय कळे?

**जखाई**—चांगली कळे! पण तुम्हीं आतां कांहीं दिवसांनीं त्या मोरीच्या डबक्यांतलंसुद्धां पाणी प्यायला लागाल.

**पुंड०**—छेः छेः तें डबकं मुद्दाम राखून टेवलं आहे.

**जखाई**—तें कशाकरितां?

**पुंड०**—तुझ्यासारख्या बेमुर्वतखोर बायका यमाच्या घरीं गेल्यावर, त्या डबक्यांतलं पाणी त्यांना प्यायला द्यायचं असतं.

**जखाई**—होय का! मग त्या थेरडीलाहि तेंच मिळेल.

**पुंड०**—तिला काय म्हणून! ती साक्षात् पुण्यवान् देवता आहे.

**जखाई**—कसली देवता? मातीची, दगडाची, का तांब्यापितळेची?

**पुंड०**—कसलीहि असो. ती देवमूर्ति मला पूज्यच आहे.

**जखाई**—असं नव्हे. मी अशाकरतां विचारतें कीं दगडाच्या मूर्तीला टांकी मारावी लागते, मातीच्या मूर्तीला खरवडावं लागतं, नि तांब्या-पितळेच्या मूर्तीला भट्टींत घालून भाजावं लागतं.

**पुंड०**—अरे हो! हें नव्हतं माझ्या लक्षांत आलं. असो चूक झाली खरी. पण पुन्हां चूक होऊं नये, म्हणून तुझ्या वडिलांना या ठिकाणीं बोलावून आणतों.

**जखाई**—माझ्या बाबांना? कशाकरितां?

**पुंड०**—टाकी मारायला, खरवडून टाकायला, किंवा असली दिवटी लेक सांगेल, तर भट्टींत घालून भाजायला. म्हणजे देवाची मूर्ति तयार होईल तुला पूजायला.

**जखाई**—हं-! माझ्या माहेरच्या माणसांविषयीं अभद्र बोललेलं मला नाहीं हो खपायचं!

**पुंड०**—आणि आम्हांला तें खपेल वाटतं? अग दांडगे, अशा तुझ्या वागण्यानं कधींच कल्याण होणार नाहीं. वडील माणसांचा द्वेष तुला धुळीला मिळवील.

**जखाई**—तें पाहीन मी. कावळ्याच्या शापानं ढोरं मरत नाहींत.

**पुंड०**—पण तूं एवढी बेफाम कशानं झालीस? पाप पुण्य आणि त्यामुळें मिळणारे स्वर्ग नरक, यांची किंमत तुला कांहींच का नाहीं?

**जखाई**—तें आपलं माझं मला ठाऊक. पण मी असं विचारतें, कीं असल्या खुळेपणानं हा प्रपंच चालेल कसा आणि वंश वाढेल तरी कसा?

**पुंड०**—माझाहि तुला तोच प्रश्न आहे. तुझ्यासारख्या कजाग बायकोबरोबर प्रपंच करावा कसा आणि, जिला वाडवडिलांची योग्यता कळत नाहीं तिच्यापोटीं तसलाच बेमुर्वतखोर वंश हवासा वाटेल तरी कसा?

**जखाई**—हें पहा, असलं तत्त्वज्ञान सांगितलंत, म्हणजे मी कांहीं तुम्हांला साधु म्हणणार नाहीं.

**पुंड०**—तुझ्यासारख्या उद्धट स्त्रीपुढें साधुहि हात टेकील, मग माझी काय कथा?

**जखाई**—हें मला नको आहे.

**पुंड०**—मग तुला काय हवं आहे?

**जखाई**—यापुढं असाच खेळखंडोबा चालायचा असेल, तर मी आपली माहेरीं जातें कशी?

**पुंड०**—खुशाल जावं; आपल्याला ती वाट मोकळी आहे.

**जखाई**—माझी वाट लावायला तुम्ही बसलांच आहां! देवा, माझ्या नशिबीं कसले रे वनवास हे!

**पुंड०**—खरंच वनवास! सुग्रास अन्न खाणं, उंची वस्त्रं वापरणं, दागदागिन्यांनीं नटणं, वाटेल त्याच्यावर वाटेल तसं तोंडसुख घेणं—वनवासच हे! नशीब, त्याला काय करायचं?

**जखाई**—आतां आणखी माझ्या जिवाचा संताप नका करूं. कोण मेला तो गोसावडा–कुर्कुट का धुर्कुटस्वामी भेटला आणि मेल्यानं माझ्या संसाराचं मातेरं केलं. देवा–त्याचं निसंतान कर.

**पुंड०**—तुझ्यासारख्या कैकाडणीच्या शापानं त्या सत्पुरुषाचं कांहीं एक वांकडं होणार नाहीं. अवदसे, दोघांच्याहि बेचाळीस पिढ्यांचा उद्धार होईल असा मार्ग ज्यांनीं दाखविला त्यांची निंदा करून नरकाची जोड कां करतेस? माझं वर्तन जर तुला आवडत नसेल, तर हीं माझी कुलदैवतं घेऊन, मीच कुठं तरी जातों. सांभाळ हें सर्व घरदार आणि हडळीप्रमाणें खुशाल एकटी घरांत फिर. ( आई–बाप येतात त्यांस ) बाबा, आटपलं का तुमचं आन्हिक.

**जन्हु०**—आटोपलं. पण तुमची धुसफुस काय चालली आहे? मुली, त्याला कांहीं अधिक उणं बोलूं नकोस बरं!

**जखाई**—हो, मी मुळीं भांडकुदळच पडलें.

**जन्हु०**—तुला तसं म्हणतं कोण! तूं आमची गृहलक्ष्मी आहेस. तुला असं वाईट वाटायला काय कारण झालं?

**जखाई**—थेरडोपंत, आपणच झालांत. आम्हां नवराबायकोंत बिघाड पाडायला आपण आणि या थेरडाबाईच कारण!

**पुंड०**—तें परमेश्वराला ठाऊक. वाडवडिलांच्या कृपाछत्राखालीं, आनंदानं दिवस काढणं तुझ्या नाशिबींच नाहीं, त्याला तूं काय करशील? देव प्रसन्न झाला, तरी वर मागून घ्यायला अक्कल लागते. कामधेनु घरीं आली, तर तिचा उपयोग करून घ्यायाला शहाणपण लागतं. भोगशील, याचींहि फळं भोगशील.

**जखाई**—बरं हो. माझा असा हिरमोड केलांत, याचींहि फळं तुम्ही भोगाल.

**तो येईल समय असा कीं ॥ मग त्या वेळे ॥ तुमचे**
**चाळे । पळतिल सगळे । व्हाल मोकळे । उघडे लोकीं ॥**
**वृद्ध थेरडीं दोन दिसांचीं ॥ अल्पाचि काळें मरतिल**
**साचीं ॥ तेव्हां माझ्या या वचनाची ॥ होय आठवण**
**तशी स्त्रियेची ॥ रडाल बहु धडपडाल अंतरिं कुढाल**
**मत्पदिं पडाल तुम्ही निःशंकीं ॥** [ फणकाऱ्यानें जाते

**सत्य०**—बाळा पुंडालिका, ती रागावून गेली रे. जा जा. तिला समजीव जा.

**पुंड०**—जाऊं द्या तिला. तुम्ही आपले माझ्याबरोबर दिंडिरवनांत चला. त्या ठिकाणीं निवांतपणें माझें कर्तव्य मला करतां येईल.

**जन्हु०**—अरे, पण त्या मुलीला सोडून जातांना आमचा पाय कसा बरं उचलेल ? ती आमचीच पोर ना ?

**पुंड०**—पण सुखाचं अन्न खाऊन जर तिला मस्ती येते आहे, तर त्याला आपण काय करणार ?

**दिंडिरवनिं जाऊं या ॥ तात हो दिंडिर० ॥ दुष्ट जनांचा**
**वास न तेथें ॥ शांतिसौख्य सेवुं या ॥ तुमचि चाकरी**
**करिन मी पुरी ॥ कुणि न वनिं करी ॥ विघ्न म्हणुनियां ॥**

**जन्हु०—श्रमशिल बहुताचि तूं विपिनीं ॥ तुज साह्य कुणी ॥**
**नच रे म्हणुनी ॥ हो दुःख मनीं ॥**

**पुंड०—न धरा ॥ शंका ॥ विनंती ॥ ऐका ॥ आनंदानें**
**तेथें राहुं या ॥ दिंडिर० ॥**

---

## प्रवेश तिसरा

( जखाईचा बाप तिला घराबाहेर घालवितो. )

**बाप**—चल, जाऊं दे तुझी धिंडका. एक क्षणभरसुद्धां इथं उभी राहूं नकोस; आलीस तशी चालती हो.

**जखाई**—पण बाबा, आतां या अनाथ मुलीनं—

**बाप**—अग चांडाळणी, चांगली सनाथ असतां, अनाथ म्हणवून कां घेतेस ? हक्काचं घर सोडून, भिकेचे डोहाळे कां आठवले ? चल नीघ.

**जखाई**—कुठं जाऊं ? आतां माझं रक्षण कोण करील ?

**बाप**—देव, ब्राह्मण, यांच्या समक्ष ज्याच्या हातांत मीं तुला दिलं, तोच तुझं रक्षण करील—मारील, चिरील, काय वाटेल तें करील. सर्वस्वीं तूं त्याची आहेस. आमच्याशीं तुझा कांहीं एक संबंध राहिला नाहीं.

**जखाई**—बाबा, माझी आई जर जिवंत असती, तर तिनं माझी अशी दशा पाहून मला पोटाशीं धरलं असतं आणि जन्मभर सांभाळलं असतं.

**बाप**—हो अशी अवदसा पोटाशीं धरणारी ती गधडी नव्हती. ती आज जिवंत असती आणि तिनं जर तुझ्यासारख्या जहांबाज पोरीला थारा दिला असता, तर दोघींच्याहि हातीं खोबऱ्याची आई देऊन, घरोघर जिलब्या करायला पाठविलं असतं.

**जखाई**—पण इतका कंटाळा करण्यासारखा माझा अपराध काय ?

**बाप**—अपराध काय ? अग अपराधानं तर सर्वांग नटवून आली आहेस. पतीची अवज्ञा केल्यामुळें तुझा तो सौभाग्यतिलक काळाभोर दिसूं लागला आहे. सासूसासऱ्यांचा द्वेष केल्यामुळं, तें डोळ्यांतलं काजळ धुऊन जाऊन, त्याचा काळिमा गालभर पसरला आहे. आईबापांची सेवा करणारा पुण्यवान् नवरा सोडून आलीस म्हणून तें मंगळसूत्र अमंगळ दिसूं लागलं आहे. शिवाय वडिलांची पदोपदीं मानखंडना केल्यामुळें तुझे ते सोन्यामोत्यांचे बहुमोलाचे अलंकार मातीमोलाचे दिसूं लागले आहेत. जा, असल्या पतिद्रोही कार्टीचं तोंडसुद्धां मला पहायला नको.

**जखाई**—पण बाबा, ते जर रात्रंदिवस वेड्यापिशासारखे वागूं लागले—

**बाप**—वेड्यापिशासारखे ? तर मग हा तुझा सगळ्यांत मोठा अपराध !. अग, वेड लागलेल्या नवऱ्याची सेवाचाकरी सोडून, अवदसे, तूं इथं कां आलीस !

**जखाई**—ऐका तरी आधीं. तें खरोखरीचं वेड नाहीं. अलीकडे ते रात्रंदिवस त्या थेरडाथेरडीची सेवा करतात.

**बाप**—मग त्यांत तुझं काय बिघडलं ? तुझ्या मनांतून तुला डोकीवर घेऊन तुझ्या नवऱ्यानं आपल्या आईबापांच्या छातीवर नाचावं होय ?

**जखाई**—तसं नव्हे बाबा.

**बाप**—मग कसं तर माझे बये ?

**जखाई**—दिवसांतून घटकाभर तरी त्यांनीं माझ्या मनाप्रमाणं वागावं कीं नाहीं ?

**बाप**—तुझ्या मनाप्रमाणं म्हणजे कसं ? तो तुला जेवायला न घालतां, उकीरडा फुंकायला पाठवीत होता !

**जखाई**—नाहीं.

**बाप**—बरं, लुगड्याच्या ऐवजीं नेसायला रकटीं देत होता?

**जखाई**—ऊं हूं.

**बाप**—तर काय दागिन्यांच्या ऐवजीं खेटरानं पूजा करीत होता?

**जखाई**—भलतंच.

**बाप**—तुला प्रेमानं न वागवतां, हडळ समजून दूर पळे?

**जखाई**—छेः!

**बाप**—तुला नरकाची खाण समजून स्पर्श करीत नव्हता?

**जखाई**—इश्श!

**बाप**—तर मग ताटिके, तो तुझ्या मनाप्रमाणें वागत नव्हता, म्हणजे कसा?

**जखाई**—पूर्वी ते जसे माझ्या आज्ञेत वागत होते, तसे कांहीं हल्लीं वागत नाहींत!

**बाप**—तुझ्या आज्ञेत?

**जखाई**—हं.

**बाप**—आणि तुझ्या नवऱ्यानं वागायचं? अग दीड शहाणे, हा उपदेश तुला कोणत्या सटवीनं केला? बायकोच्या आज्ञेत नवऱ्यानं वागायचं, हें तत्त्वज्ञान तुला कोणत्या हडळीनं शिकविलं? अग चांडाळणी, नवऱ्यावर पगडा बसवून त्याला ताटाखालचं मांजर करूं पाहणाऱ्या तुझ्यासारख्या स्त्रियांना, भर दोनप्रहरीं उन्हांत उभं करून, मारे चाबकाखालीं झोडल्या पाहिजेत. मोठ्या तोऱ्यानं वरचेवर उडणारं नाक कापून, गाढवावरून धिंड काढली पाहिजे. आणि दिवसभर वटवट करणारं हें थोबड, दोन्ही हातांनीं यथेच्छ थोबाडलं पाहिजे.

**जखाई**—पण बायकांनीं आपल्या नवऱ्यांना आज्ञेत वागवलं, तर त्यांत पाप काय झालं?

**बाप**—पाप काय झालं? अग कैदासणी, महारोग्याला पाहून जसा साप पळतो, तसं तुम्हांपासून प्रेम पळतं; दयेच्या ऐवजीं तिटकारा येतो. तुमच्या अंगाला हात लावायला यमाचे दूतहि भिऊन पळतात. अग कारटे,

आपला पति, रूपानं, गुणानं, श्रीमंतीनं, कसाहि असो; पण एकनिष्ठपणानं त्याची सेवा करणं, सन्मार्गानं वागून त्याला संतोष देणं, हाच पतिव्रता स्त्रियांचा धर्म. पति हेंच त्यांचं दैवत. तेंच नीट सांभाळलं, म्हणजे इहलोकीं स्वार्थ आणि परलोकीं परमार्थ साधून अंतीं ईश्वरप्राप्ति होते. इतकं सोपं साधन तुम्हां बायकांकरितां ठेवलं असतां, कारटे, तें सोडलंस आणि इथं सौख्य भोगायला आलीस काय ?

**जखाई**—बाबा, तुम्हीं सांगतां त्याप्रमाणं वागलें असतें, पण त्या सासुसासऱ्यांच्या कर्मकटकटीला काय करूं ?

**किती सांगु तयांचे चाळे हो ॥ मम जन्माचे सोहाळे ॥ चालले ॥ तीं तिघें एकमत असतीं ॥ गृहिं गप्पा ठोकित बसतीं ॥ मजकडुनि काम करवीतीं ॥ चाल ॥ नच शब्द सुखाचा मिळे ॥ म्हणुनि त्रासलें । जिणें त्यामुळें ॥ नकोसें झालें ॥ परि तुम्हां रुचे हें सगळें ॥**

**बाप**—बस्स. बस्स. तुम्हां बायकांना, सासरचीं खोटीनाटीं गाऱ्हाणीं माहेरीं सांगण्याची खोडच असते. उठल्यासुटल्या सासरचं रडगाणं मोठा गळा काढून आईबापांच्या कानांवर घालणें, हेंच तुमचं स्त्रीगीत. तिखटमीठ लावून चाहाड्या सांगणं हीच तर तुमची करमणूक. पण डोळे मिटून मुलीचं खोटं-नाटं ऐकून, विनाकारण व्याह्याशीं भांडण करणाऱ्या नंदीबैल बापाप्रमाणें मी नाहीं, समजलीस ?

**जखाई**—बाबा, मी गाऱ्हाणं नाहीं सांगत, पण मी ज्यांची सेवाचाकरी करायची, तेच मुळीं सदासर्वकाळ आईबापांचं डोकं धरून बसतात.

**बाप**—तर मग फारच उत्तम. प्रत्येकानं आपले आईबाप पूज्य मानून, त्यांची सेवाचाकरी केलीच पाहिजे. तें जर तुला आवडत नसेल तर, कारटे, तूं इथं राहून मला तरी काय सौख्य देणार ? तूं एवढी मोठी वाढलीस आणि लोकनिंदेची चाड न धरतां बापाच्या घरीं राहूं पाहतेस ? अग गांवांतल्या बायका 'नवऱ्यानं टाकलेली ही अवदसा' असं म्हणून तुझ्याकडे बोट दाखवतील. कुटाळ पोरं-'नवरा नको म्हणणारी ही चावट-सटवी' म्हणून तुझी चेष्टा करतील. शिष्ट लोक-'स्वच्छंदानं वागणारी ही छटेल' म्हणून नाकं मुरडतील.

याची तुला लाज नाहीं वाटत ? जा; तुझा नवरा आईबापांची सेवा करून दमला, म्हणजे तूं त्यांची सेवा कर, त्या योगानं त्याला फार आनंद वाटून आई-बापांची सेवा पुन्हां करायला नवीन उमेद येईल. पोरी, या योगानंच तूं इहपर-लोकीं धन्य होशील. तर जा त्याच्याकडे आणि सौख्य, कीर्ति यांनीं मंडित हो.

**जखाई**—बरं बाबा, मी जातें आणि तुमच्या आज्ञेप्रमाणं वागतें; पण आजचा दिवस तरी मला इथं राहूं द्या.

**बाप**—हं ? तर मग इतका वेळपर्यंत उपड्या घड्यावर पाणी ओतलं म्हणा-यचं. कारटे, तुझ्यासारख्या ढालगज सटवीला एक दिवस काय पण एक पळभर-सुद्धां मी आपल्या घरांत थारा देणार नाहीं. असल्या स्वच्छंदानं वागणाऱ्या कारटीला जो बाप थारा देईल तो बाप कसला—कन्येच्या सुखांत माती काल-वणारा बेरड ! तिच्या पातिव्रत्याचे तुकडे तुकडे करून विकणारा कसाई. तिच्या सौभाग्याला फांशी देणारा मांग. आणि मुलीचा वंश बदनाम करणारा प्रत्यक्ष कलिपुरुष ! तर जा, तुझं तें काळंठिक्कर तोंड मला पाह्यला सुद्धां नको. परमेश्वरा, असा बदलौकिक करणारीं कारटीं पोटीं येण्यापेक्षां निसंतान बरं. किंवा या उप्पर मानससृष्टि निर्माण कर, म्हणजे काळं तोंड झालेले आईबाप तरी जगास दिसणार नाहींत.

**जखाई**—बाबा, असं बोलून जिवाचा संताप करून घेऊं नका. मी जातें, तुमच्या पायांची शपथ मी जातें. पण मी दोन दिवसांची उपाशी आहें, मला थोडंसं खायला द्या.

**बाप**—छट् ! ती गोष्ट व्हायची नाहीं. तूं अन्नावांचून तडफडून मेलीस तरी चालेल, पण इथं एक घांसभरसुद्धां अन्न मिळणार नाहीं. नवऱ्याकडे जा आणि त्याच्या जवळ प्रेमाची भिक्षा माग, म्हणजे तुझ्या पदरांत पुष्कळ अन्न पडेल. अन्नच काय, पण हिरेमाणकं, प्रत्यक्ष त्रिभुवनांतलं सौख्यसुद्धां येऊन पडेल. जी वेस्वा नवऱ्याला सोडून भीक मागते, तिच्या पदरांत नुसती धूळ—धूळ पडते. तर जाऊन नवऱ्याच्या पायावर डोकं ठेव; त्याचं प्रेम मिळीव; त्याला प्रिय हो; आणि त्याच्यासह इथं ये. म्हणजे हा तुझा बाप आनंदानं तुम्हांला सामोरा येईल आणि वाजतगाजत मोठ्या थाटानं घरीं उभयतांना घेऊन जाईल. तर जा परत, खग्रास ग्रहण लागलेलं हें तुझं तोंड पाहून, माझ्या डोळ्यांपुढं अंधेरी येते.

**जखाई**—नका हो बाबा, मी याच पावलीं जातें आणि तुमच्या उपदेशा-प्रमाणं वागतें. तुमची दुर्गुणी कार्टी मेली आणि यापुढं ही दुसरी सद्गुणी जन्मली असं समजा. हीच तुमच्या पायांची शपथ.

**बाप०**—शाबास, हें बोललीस म्हणून मीं तुला आतां पोटाशीं धरतों. ये बाळ, आतां वाटल्यास थोडंसं कांहीं खाऊन जा.

**जखा०**—नाहीं बाबा, ती गोष्ट आतां व्हायची नाहीं. अन्नावांचून प्राण गेले तरी बेहत्तर. पण मी आपल्या अपराधांची क्षमा मागून तिकडल्या पायांची प्रियकर दासी, असं म्हणवून घेतल्यावांचून मी आतां पाणीसुद्धां पिणार नाहीं. चला बाबा, माझ्याबरोबर. माझ्या अंगांतला तो पूर्वीचा दांडगेपणा गेल्यामुळं, आतां मला एकटीच्यानं परत जाववणार नाहीं.

**बाप०**—तर मग मी येतों तुझ्या सोबतीला, पाहिजे तर पालखींत बसवून नेतों.

**जखा०**—कांहीं नको. तिकडच्या या दासीला आतांच हा थाटमाट नको आहे.

**पितया नमित तव पायां ॥ येऊं द्या मुलिची दया ॥**
**शिबिका असुनि पतिमाया ॥ वाहनें दुजि कासया ॥**
**परि मन थरकत म्हणुनियां ॥ प्रियकर पतिपद दावाया ॥**
**मज करितां तुम्हि वनिं या या ॥ विनयें पसरिं पदरा**
**या ॥ येऊं द्या० ॥ बघतें सुगुण पतिराया ॥ क्षुधेला**
**शमवावया ॥ पतिपद जल मज तें प्याया ॥ पदरजिं**
**सजविन ही काया ॥ म्हणविन तिकडची प्रिय जाया ॥**
**शिकवा मजासि सदुपाया ॥ येऊं द्या मुलिची दया ॥**

---

## प्रवेश चवथा

( पुंडलीक दिंडिरवनांत आईबापांची सेवा करीत बसला आहे. )

**पुंड०**—अहाहा ! केवढं हें या पुंडलिकाचं भाग्य ! इथं आल्यापासून माझ्या आईबापांची सेवा निर्वेधपणें चालली आहे. आईबापांच्या सेवेवांचून सौख्य, शांति आणि समाधान कशांतहि नाहीं, असं हा पुंडलीक खात्रीनं सांगेल. माझी निर्मळ भक्ति पाहूनच—

**हा वृक्ष जणुं मित्र ॥ स्नेहास सत्पात्र ॥ धरुनी वरी**
**छत्र ॥ हिमताप वारी ॥ फलपुष्प निजपार्णी ॥ हरिती**
**क्षुधा कोणि ॥ भीमा नदी न्हाणि ॥ तृष्णा निवारी ॥**
**तृणयुक्त ही भूमि ॥ शय्या विपिनधार्मि ॥ शांति प्रिया**
**नामि ॥ आरामकारी ॥** [ जखाई व तिचा बाप येतात.

**बाप**—अहाहा ! या पुंडलिकाची एखाद्या तपस्व्याप्रमाणं गंभीर मुद्रा पाहून मनाला असं वाटतं कीं, पुत्रवात्सल्य सोडून, एकदम याला प्रणाम करावा. मुली, तो बघ आईबापांची सेवा करीत असलेला तुझा पति, एखाद्या योगींद्राप्रमाणं दिसतो आहे. तर जवळ जाऊन त्याच्या पायांवर डोकं ठेव आणि आपल्या अपराधांची क्षमा माग.

**जखाई**—बाबा, कसली हो मी कर्मचांडाळीण ! ज्यांच्या जिवावर सुखाचा संसार करून, अंतीं मोक्ष साधायाचा, त्या जिवाची मीं दुष्टेनें पदोपदीं मानखंडना केली, घटकाभर देखील सुख लागूं दिलं नाहीं, वाईट शब्दांनीं त्यांचं मन दुखविलं. आतां हें काळं तोंड मी त्यांना कसं हो दाखवूं—बाबा !

**बाप**—मनांतील भीति सोडून त्याचे पाय घट्ट धर. शांतवृत्तीनें तपस्व्यालाहि लाजविणारा तुझा पति तुझ्यावर कधींहि रागावणार नाहीं. जा हो पुढं.

**जखाई**—महाराज, ही अभागीणि–पापिणि शरण आहे. या कृत्येचे सर्व अपराध विसरून, हिला क्षमा करा.

**नाथा चरणाची ही दासी ॥ नमित्ये हृदयनिवासी ॥ आलें मी अपुल्या सेवेसी ॥ दीनपणें वनवासी ॥ ठेवा बटकीसी पायांसी ॥ तुटक वागवा मजसी ॥ चाल ॥ करितां पितरांसी उपचार ॥ होतील श्रम अपणां अनिवार ॥ प्रेमें करिनचि मी परिहार ॥ करित्यें विनंति तुम्हांसी ॥ नाथा० ॥**

**पुंड०**—अग, हळू रड. मोठ्यानं रडशील तर माझ्या आईबापांची झोंप मोडेल. पण मी म्हणतों, तूं आतां रडतेस कां ?

**जखाई**—पश्चात्तापानं माझं हृदय जळतं, म्हणून रडतें. महाराज, आजपर्यंत मी आंधळी होतें; बरावाईट मार्ग मला दिसत नव्हता. आपण माझे देव, आपली सेवा हीच माझी पूजा, आपलं ध्यान हाच माझा जप, आपली आज्ञा हाच माझा प्रसाद. हें सारं सोडलं आणि बहकलेल्या अवदसेप्रमाणं मनसोक्त वागलें; पण यापुढं मी आज्ञेबाहेर जाणार नाहीं. आपल्या तोंडांतून जे शब्द निघतील तेच माझे शब्द. जें आपल्याला ऐकूं येईल, तेंच मला ऐकूं येईल. आपलं मन तेंच माझं मन. मी देह आणि आपण आत्मा.

**पुंड०**—इतकं झाल्यावर भिन्नपणा राहिला कुठं ? भगवंतानं स्त्रीपुरुषांचा एकच देह केला आहे. अर्ध्या अंगाला वेदना झाल्यावर सर्व अंगाला झाल्याच पाहिजेत. जाऊं दे आतां रडूं नकोस. यांचा आतांच डोळा लागला आहे, तेव्हां कदाचित् झोंप मोडेल. तूं गेल्यापासून तुझ्या काळजीनं त्यांना घड झोंपहि नाहीं. उगी रहा आतां.

**जखाई**—तर मग माझ्या अपराधांची मला क्षमा केली ना ?

**पुंड०**—पण मी जर रागावलोंच नव्हतों तर क्षमा तरी करूं कसली ? गुरुमहाराजांच्या कृपेनं षड्रिपूंनीं आपलं ठाणं माझ्या शरीरांतून केव्हांच काढून नेलं आहे, तेव्हां तूं कशी जरी असलीस तरी हा पुंडलीक तुझाच आहे. पश्चात्तापानं तुझं मन शुद्ध झाल्यावर तुझ्या इच्छेचा भंग माझ्याकडून प्राणांतीं होणार नाहीं. असो. तूं थकलेली दिसतेस. थोडीं कंदमुळें खा, पाणी पी आणि माझ्या आईजवळ जरा झोंप घे, म्हणजे जिवाला बरं वाटेल.

**जखाई**—आतां माझ्या जिवाला काय धाड भरणार आहे ? आपल्या दर्शनानं माझा थकवा गेला आणि गोड भाषणानं भूकहि हरली. म्हटलं—सासूबाईंचे पाय मी चेपते.

**पुंड०**—छेः छेः ! शेणामातीनं बरबटलेले तिचे पाय तूं कशाला चेपतेस ? तुझे हात खराब होतील.

**जखाई**—आतां आणखी दुःखावर डागण्या देऊं नये.

**पुंड०**—राहिलं. तर मग बैस अशी जवळ आणि हलक्या हातानं सावकाश हिचे पाय चेप. सासुसासऱ्यांची सेवा करणं, हें भाग्याचं आणि पुण्याईचं लक्षण आहे. [ जखाई सासूचे पाय चेपते.

**बाप**—( स्वगत ) वाहवा ! आतां या मुलांकडे पाहून, ज्याला प्रेम येणार नाहीं, आनंदानं गहिंवर येणार नाहीं, तो पाषाणहृदयाचाच म्हटला पाहिजे. ( उघड ) पुंडलीकराव, आपलं अर्धांग उन्मादानं बिघडलं होतं, तें दुरुस्त करून आपणाकडे आणलं आहे. झाली आमची कामगिरी, येतों आतां.

**पुंड०**—आपले मोठे उपकार आहेत. मी तूर्त बाबांच्या सेवेंत गुंतलों आहें, म्हणून मी इथूनच प्रणाम करतों. आपण फार थकलां आहांत, जरा विश्रांति घ्या. बाबांची सेवा झाली, म्हणजे आपल्या सेवेला हजर होतों. आपणहि मला वडिलांप्रमाणेंच आहांत.

**बाप**—बाबा रे, गोड शब्दांनीं स्वागत केलंस यांत मी सर्व भरून पावलों. तुझ्याकडून सन्मानाचा गोड शब्द मिळाल्यामुळं मला मोठा आनंद वाटला. ( स्वगत ) सासऱ्यावर विनाकारण रागावणाऱ्या जावयांनीं याचा कित्ता घ्यावा. ( उघड ) येतों आतां. परमेश्वर आपलं कल्याण करो. मुली, मी येतों बरं ? सांगितलेलं ध्यानांत आहे ना ? विसरूं नकोस बरं ? येतों मीं. [ जातो.

**पुंड०**—अग, माझ्या आईचे पाय हळूच चेप बरं.

**जखाई**—हें आतां मला सांगायला का पाहिजे ? जे आपले आईबाप ते मलाहि आईबापच. आपल्यासारखेच ते मला पूज्य आहेत. आतां जी मी आपल्याशीं भांडणार—

**पुंड०**—काय भांडणार ? तर मग स्वभावांतला भांडखोरपणा अद्यापि गेला नाहीं वाटतं ?

**जखाई**—कसा जाईल ? बायकांचा मूळचा मत्सरी स्वभाव पालटेल तरी कसा ?

**पुंड०**—म्हणजे आलीस का पुन्हां पहिल्या वळणावर ?

**जखाई**—ऐकावं तरी. यापुढं जें भांडण लागायचं, तें यांची सेवाचाकरी कुणीं करायची, याबद्दल. आतां सगळी सेवा मी आपल्यालाच नाहीं करूं देणार.

**पुंड०**—मातृपितृदेवेभ्यो नमः। असं झाल्यावर या पुंडलिकाला अधिक तें काय पाहिजे ? पण थांब, सहस्रकोटी सूर्याप्रमाणें ही प्रभा कसली ! या पुंडलिकाची मातृपितृभक्ति कसाला तर लागत नसेल ! अथवा लागेना, आईबापांच्या कृपेनें हा पुंडलीक हव्या त्या कसोटीला उतरेल. पलीकडून चंद्राकृति वाहत जाणारी ही भीमरथी, सगळं भूमंडळ दणाणवीत माझी भक्ति कसाला लावण्याकरितां अंगावर धांवत आली; त्या वेळींहि मी डगमगलों नाहीं. तेव्हां तिनंच कृपा करून चंद्राकृति वळसा घेतला; आणि त्यामुळंच मीं तिचं नांव 'चंद्रभागा' असं ठेवलं. वाः ! प्रकाश तर अधिकच वाढूं लागला.

**जखाई**—मला कीं नाहीं हा प्रकार पाहून भीति वाटते.

**पुंड०**—भिण्याचं कांहीं कारण नाहीं, माझ्या आईचे पाय तूं धरले आहेसच, तेच तुझं रक्षण करितील. मात्र कांहीं झालं, तरी चाललेली सेवा सोडूं नकोस. आईबापांची—वाडवडिलांची सेवा करणारांवर देवता प्रसन्न असतात; म्हणून मातृपितृवात्सल्याचा अनुभव घेतलेले राम—कृष्ण आपल्यावर कृपाच करतील.

**कृष्ण**—( प्रकट होऊन ) तथास्तु ! तथास्तु !! तथास्तु !!!

**मम प्रिय सख्या सकल गुणधाम ॥ किती तरी असे मधुरतर तव नाम ॥ हे पुंडलीक गुरुजनसेवक ॥ भक्ति बघोनि तुझी निष्काम ॥ हा मुरलीधर प्रसन्न तुजवर ॥ घेई विहित घर वरीं विराम ॥**

**पुंड०**—अग, प्रत्यक्ष भगवान् द्वारकाधीश आले बरं ! ही शेवटची कसोटी आहे. चालतेली सेवा मात्र सोडूं नकोस.

**कृष्ण**—मातृपितृभक्ता, महापुरुषा पुंडलिका, तुझ्या भक्तीकरतांच मला इथं यावं लागलं.

**पुंड०**—भगवान्, आपलं भक्तवात्सल्य सगळं जग जाणतं आहे, तें मीं पामरानं आणखी कसं वर्णन करावं! हा पुंडलीक आपल्याला अनन्यभावान शरण आहे.

**कृष्ण**—तर मग मला कडकडून भेट ये. भक्तासाठीं नेहमीं उत्कंठित असलेलें हें हृदय तुझ्या आलिंगनानं शांत करूं दे. वत्सा, ये.

**पुंड०**—भगवंता, एवढी आईबापांची सेवा पुरी झाली कीं, मग आपल्या चरणांजवळ येतों; तोंपर्यंत आपल्याला आसन काय द्यावं बरं! ही जवळ असलेली वीट देतों. हिच्यावर अंमळ विश्रांति घ्यावी. [ वीट फेंकतो.

**कृष्ण**—काय! देवाच्या भेटीपेक्षां, तुला आईबापांची सेवा अधिक वाटते!

**पुंड०**—तें आपण जाणतांच. भगवंतांनीं इथं येण्याचे श्रम कां घेतले, आपलं मनोहर रूप पाहण्याचा सुयोग कोणत्या पुण्याईनं मला आला, माझं पापी शरीर आपल्या बाहुपाशांत घ्यावं, असं आपल्याला कां वाटतं, हें सर्व जाणत असून, देवा, माझा अंत पाहूं नका. कृपा करा आणि तसेच उभे राहा, आपलं हें लोकोत्तर दिव्य स्वरूप, माझ्या आईला आणि बाबांना डोळे भरून पाहूं द्या. रात्रंदिवस ते आपला धांवा करतात, हें आपणास ठाऊक आहेच.

**कृष्ण**—पुंडलिका, तुझ्या इच्छेप्रमाणें होऊं दे. त्यांना जागृत कर.

**पुंड०**—छिः छेः या वृद्धांची सोन्यासारखी झोंप मोडायला मला सांगूं नका. त्यानं माझ्या पुण्याईचा क्षय होईल आणि, देवा, आपण आम्हांला अंतराल हो.

**कृष्ण**—धन्य धन्य; तुझ्या आईबापांना मींच योगनिद्रा लाविली आहे ती काढून घेतों. [ सत्यवती व जन्हुशर्मा जागृत होतात.

**दोघे**—( उठून ) किती तरी दिव्य तेजांत हा आत्मा मिळून गेला होता! अरे पण तेंच हें दिव्य तेज! बाळा पुंडलिका, काय रे हें! कल्पवृक्ष दारीं असतां, आमचे पाय कशाला धरून बसलास! भगवान द्वारकाधीश तिष्ठत आहेत, चला दर्शन घेऊं. [ सर्व उठून पाया पडतात.

**कृष्ण मुकुंदा हरि गोविंदा वंदन हे सेवा ॥ भक्तवत्सला दीनदयाळा करुणामय देवा ॥ असुनि अगोचर दिसला परि हो कृपणाचा ठेवा ॥ अनाथ आम्हीं नाथ तुम्ही हा लोभ सदां ठेवा ॥ अमुच्या वदनीं तव नामाचा वसो गोड मेवा ॥ करितिल सुरवर हेवा अमुचा पक्षधरा तेव्हां ॥ उद्धव अक्रुर पांडव तैसे भक्त नसों आम्हीं ॥ प्रभुसेवेची रीत ठाउकी नसे अम्हां स्वामी ॥ अल्पमतीनें सुप्रेमानें रतलों या कामीं ॥ गोड करुनि घ्या जोड हीच द्या तुमची पदसेवा ॥**

**कृष्ण**—पुंडलिका, तुझ्यासारखे भक्त भेटले कीं, मला अत्यानंद होतो. मी तुम्हा सर्वांवर प्रसन्न आहे; कांहीं मागून घ्या.

**जन्हु**—देवा, तुमचं हें मंगलदायक मनोहर स्वरूप या चंद्रभागेच्या कांठीं अक्षयीं दिसावं.

**कृष्ण**—ठीक आहे. तर मग तुम्हां सर्वांची इच्छा पूर्ण करण्याकरितां या चंद्रभागेच्या कांठीं मी 'विठ्ठल' या नांवानं नववा अवतार घेतों आणि तुम्हां सर्वांना मी आपल्याजवळच ठेवतों; म्हणजे तुमच्या पुण्यप्रभावानें या दिंडीरवनाची, प्रति द्वारकाच अशी दिव्य नगरी बनून ती पंढरीक्षेत्र या नांवानं प्रख्यात होईल; आणि त्यावरून लोक मला पंढरीनाथ असं म्हणतील. भक्तचिंतनानं मी पांढरा फिक्कट झालों, असं मानून लोक भक्तिभावानं मला पांडुरंग असंहि म्हणतील. बरं पण पुंडलिका, माग रे बाबा, तूं कांहीं माग.

**पुंड०**—देवा! माझ्या आईबापांची इच्छा पूर्ण केलींत, यांतच मला आनंद आहे. पण दासावर अनुग्रह करावयाचा असेल, तर या पुंडलिकाच्या हातून जन्मोजन्म अशीच आईबापांची सेवा घडावी.

**जन्हु०**—आणखी अशा मातृपितृभक्त सत्पुत्रांचा नेहमीं उद्धारच व्हावा.

**सत्य०**—त्याचप्रमाणें, पुंडलिकासारखा पुत्र आम्हांला जन्मोजन्म द्यावा.

**जखाई**—तसंच भगवंता, पुंडलिकासारखे पति मलाहि जन्मोजन्म मिळावे.

**कृष्ण**—अरे! पण आतां तुम्हीं सर्व जन्ममरणापासून मुक्त आहांत. कारण माझ्या दर्शनानंतरहि जर प्राण्यांना जन्ममरणाचं दुःख भोगावं लागलं, तर

भक्तांच्या भक्तीचं आणि माझ्या भक्तवात्सल्याचं माहात्म्य काय राहिलं ? पण माझ्या भक्तांची मागणी असत्य होऊं नये म्हणून मी तुम्हांला असा वर देतों कीं, जे कोणी आईबाप कशाहि प्रसंगीं आपल्या मुलावर प्रेम ठेवून, निरंतर माझं चिंतन करतील ते, ज्या कोणी स्त्रिया पतीची आणि वाडवडिलांची मनोभावानं सेवा करतील त्या, व जे कोणी सुपुत्र तुझ्याप्रमाणं आपल्या आईबापाची भक्तिभावानं सेवा करतील, त्या सर्वांचा तुमच्याप्रमाणंच उद्धार होऊन, अंतीं ते कैवल्यपदाला पोंचतील. बरं पुंडलिका, आणखी कांहीं तुझी इच्छा !

**पुंड०**—देवा, यापुढं कलिप्रभावानं मनुष्याचं आयुष्य कमी होणार; बुद्धिबल, शक्तिसामर्थ, हीं सुद्धां कमीच होणार; तेव्हां जपतपासारखी तुमची कष्टकारक सेवा लोकांच्या हातून होणें कठीण. अर्थात् त्यांना सद्गति कशी मिळावी ?

**कृष्ण**—तेंहि सांगतों, ऐक. आजपासून माझ्या नामसंकीर्तनानं लोकांचा उद्धार होईल. जपतपादि खटाटोपाचं कारण उरणार नाहीं. येथपासून भागवत धर्माचा विशेष प्रसार होईल. पुंडलिका, या भागवत धर्माचा तूं पुरस्कर्ता, म्हणून सर्व लोक माझ्या नांवापूर्वी तुझ्या नांवाचा उच्चार करतील, आणि त्यामुळं हा भवसागर तरून जातील. ‘पुंडलीकरवदा हरिविठ्ठल’ हा नाममंत्र सर्वतोमुखीं होऊन, भावानं तो म्हणणारे आणि ऐकणारेहि मोक्षालाच जातील.

**पुंड०**—एकूण भगवंताच्या वात्सल्याला अंत नाहीं हेंच खरं.

**कृष्ण**—हे महाभागवता पुंडलिका, आणखीहि मी तुला शेवटचा वर देतों. या चंद्रभागेच्या वाळवंटांतील तुझा आश्रम, हाच या पंढरीक्षेत्राचा मुख्य महिमा होऊन राहील. जे कोणी संतमहंत माझ्या दर्शनाकरितां येतील त्यांनीं प्रथम तुझं दर्शन घेतल्याशिवाय त्यांच्या पंढरीच्या यात्रेची सांगतांच होणार नाहीं; हा माझा पूर्ण आशीर्वाद आहे.

**सत्य०**—माझी सून खरी भाग्याची. इथं आल्याबरोबरच श्रीभगवंताचं दर्शन आम्हांला करवलं..बाळ, देवाजवळून तूंहि कांहीं मागून घे.

**जखाई**—सासूबाई, मला हवं होतं तें तिकडून मागून घेतलं; आतां मी आणखी काय मागणार ! तथापि देव प्रसन्नच आहेत, तर माझ्यासारख्या कजाग स्त्रियांना सुबुद्धि देऊन, अंतीं सन्मार्गच सुचवावा.

**कृष्ण**—ठीक आहे. आतां विठ्ठलाच्या रूपानें मी अवतीर्ण होतों.

[ विष्णुमूर्ति प्रगट होते, सर्व 'पुंडलीकवरदा हरिविठ्ठल' म्हणून भजन करूं लागतात.

**विठाई माउलि ही आम्हां भक्तांची साउली ॥ पुंडलिका वर द्याया आली आपुल्या पाउलीं ॥ सांवळी गोजिरी मूर्ती देखिली डोळा ॥ जळोनि गेलीं पापें आम्हीं भिऊं न कलिकाळा ॥ दर्शनमात्रें चित्तीं आम्हां जाहला बोधू ॥ विटेवरी तिष्ठसि म्हणुनी विठ्ठल संबोधूं ॥ युगीं युगीं तूं श्रमसी आतां विश्रांती घेईं ॥ आलिया गेलिया नुसतें दर्शनसुख देईं ॥ गोपगोपिका यादव ना जरि सोन्याची नगरी ॥ भक्तमेळ तरि मिळवूं वसवूं द्वारका दुसरी ॥ दिव्य पताका दिंड्या तुळसीवृन्दावन देव ॥ येणें शोभवुं नगरी आम्ही होऊं वैष्णव ॥ मृदंग वीणा टाळ वाजवूं म्हणूं पांडुरंग ॥ गर्जूं जयजयकारें नाचूं गाऊं अभंग ॥ आणिक कांहीं न करूं घेऊं मनीं हाचि छंद ॥ पुंडलीकवरदाता श्रीहरि विठ्ठल गोविंद ॥**

**पुंड०**—देवा, माझ्या वडिलांची इच्छा आहे कीं, बाळपणीं यमुनेच्या कांठीं, कुंजवनांत गोपगोपीसह आपण केलेलं क्रीडाकौतुक एकदां या दृष्टीनं पाहावं, तर करावं त्यांना धन्य.

**कृष्ण**—जशी तुमची इच्छा.

[ कृष्ण विमानांत बसून मुरली वाजवितो; तोंच कुंजवनाचा सुंदर देखावा दिसूं लागतो व गोपगोपी प्रगट होतात.

**सर्व**—गोपालकृष्ण महाराजकी जय !

[ रासक्रीडा सुरू होते.

**नंदनंदना, करुनि वंदना ॥ प्रबंध गाऊं छंदें या ॥**
**रास खेळुं हरि रमवाया ॥ दुष्ट काळिया । महान् बळिया ।**
**विषें छळी व्रजिं गोंवळिया ॥ तया पळवि हा सांवळिया ॥**
**कोपुनि सुरवर । मेघ भयंकर । पाडि व्रजावर त्या समया ॥**
**रक्षित गिरिधर होउनियां ॥ प्रचंड राक्षस उदंड छळिती ।**

चंड दंड परि करुनि तयां॥ सुखवि जनांसह निज पितया॥ देऊं टिपरी। घेऊं फेरी। चौऱ्यांशीची चुकवाया॥ याहुनि दुसरें सुख वायां॥

राधाकृष्ण जय गिरिधारी। पुंडलिकाचा सहकारी। सोडुनि सोन्याची नगरी॥ अढळ राहिला विटेवरी॥ पुंडलिकाच्या भक्तिवरी॥ प्रसन्न झाला कंसारी॥ प्रार्थियलें त्याच्या पितरीं॥ रास दाखवा सुखकारी॥ जाणुनि त्यांची आस बरी॥ पूर्ण कराया सिद्ध हरी॥ वेणु वाजवी मधुरस्वरीं॥ अम्हांस प्रेमें पाचारी जमुनी आम्हीं सुकुमारी॥ रासोत्सव करुं परोपरी॥ आनंदाचा दिन भारी॥ सुखास उपमा नच दुसरी॥ थकले जेथ सहा चारी॥ दास वार्णि तें कोठवरी॥

मन हें हरिलें हरिला भुललें चिरकालें। हरिगुणगानीं डोले॥ छंद हरीचा, कालपुरीचा छल साचा। चुकविल जन्मांतरिंचा॥ यातायाती व्हावि कशा ती हरि गाती। मिळे तयां सुखशांति॥ अहंपणाचा गंध फुकाचा कलिजाचा। कारण असतो साचा॥ त्यजुनि भ्रमाला करुनी लीला व्रजबाला। भोगिति मोक्षसुखाला॥ अभिन्न आम्ही टाकुनि तूं-मी हरिगामी। झालों रत आरामीं॥ आम्ही माया श्रीहरिजाया नाहीं दुज्या। मग्न हरिरूपीं या॥ भिन्न न दोही तद्रूपें ही हरि घेई। शंका मुळिंही नाहीं॥ तो सर्वेश्वर नटला जगभर भिन्नरुपें। तत्त्व असें हें सोपें॥ 'अहं ब्रह्म' हें सुतत्त्व आहे मृषा नव्हे। शास्त्रपुराणीं पाहें॥

---

# ईशप्रार्थना !

हे नमन असो तुजला गोपाला घननीला पूर्ण कृपाळा ॥ विबुधांतररंजन नित्यनिरंजन दैत्यविभंजन वत्सव्यंजन कंजनयन व्रजजनपाला ॥ हे नमन० ॥ बहु सूक्ष्म निरीक्षण खलराक्षसगणवक्षविदारण दक्षविलक्षण, बुधरक्षणलक्षणशीला ॥ हे नमन० ॥ हा भवसागर दुस्तर अतितर मी तव पामर यांतुन लवकर पार करीं नाविक कुशला ॥ तमोरूपाशिव सद्गुणमाधव रजकमलोद्भव गुणत्रयोत्सव दत्तात्रेयगुरो विमला ॥ हे नमन० ॥

